# दूरचे दिवे

[ चार अंकी सामाजिक नाटक ]

वि. वा. शिरवाडकर

1946




★ ३८ ★

मूल्य दीड रुपया

पहिली
आवृत्ति
१९४६



छायाचित्रें
प्रकाश
स्टूडिओ
मुंबई २

मुखपृष्ठ
दीनानाथ
दामोदर
दलाल

ब्लॉक्स
बॉम्बे
प्रोसेस
स्टूडिओ

मुद्रक
बा. ग. ढवळे
कर्नाटक
छापखाना
मुंबई २

प्रकाशक
के. भि. ढवळे
श्री-समर्थ
सदन
मुंबई ४

हें नाटक माझ्याकडून लिहिलें गेलें याचें श्रेय ( अथवा जबाबदारी ) सर्वस्वी डॉ. भालेराव यांजकडे आहे. ‘मराठी नाट्यालय’ या संस्थेसाठीं त्यांना नव्या नाटकाची जरूरी होती. रंगभूमींत नवें चैतन्य निर्माण करण्यासाठीं कांहींतरी करावें अशी त्यांची इच्छा असल्यानें ते नेहमीं नाटकाच्या शोधांत असत. स्वतंत्र नाटकें न मिळालीं तर रूपान्तरासाठीं इंग्रजी नाटकांच्या प्रतीही ते आपल्या लेखक मित्रांच्या हवालीं करीत. माझ्याकडे त्यांनीं अशीं दोन नाटकें दिलीं. त्यांतील एक मला प्रयत्न करण्यासारखें वाटलें आणि प्रस्तुत कृति म्हणजे त्या प्रयत्नाचीच भलीबुरी फलश्रुति होय. डॉ. भालेराव यांचा मी ऋणी आहें.

ऑस्कर वाईल्डच्या ‘आयडियल हजबंड’ या नाटकावरून हें नाटक लिहिण्यांत आलें आहे. हें निर्भेळ रूपान्तर नाहीं. कथासूत्र आणि प्रसंग कायम ठेवून घेतां येईल तेवढें स्वातंत्र्य [ विशेषतः संवादांत ] घेतलें आहे. मुख्य कथानकाशीं निगडित नसलेला कांहीं भाग – पहिल्या तिन्ही अंकांचे प्रारंभ, पुष्पा, रावबहादुर, सदानंद यांचे प्रवेश हे — बहुतांशीं नवीन आहेत. मुळांतील कांहीं भाग वगळला आहे आणि कथासूत्रांतही कांहीं किरकोळ फरक केले आहेत. हें सारें ऑस्कर वाईल्ड सुधारण्यासाठीं केलें नाहीं, तर मराठी वातावरणाच्या दृष्टीनें त्यांतील क्लिष्टता घालवण्यासाठीं. शिवाय नैष्ठिक रूपान्तराचा हेतु मुळांतच नव्हता.

मुंबईतील नाट्यमहोत्सवानें जाहीर केलेल्या पारितोषकासाठीं हें नाटक सादर करण्यांत आलें आणि त्यासाठीं समितीनें त्याची निवडही

केली. या महोत्सवांत 'मराठी नाट्यालया' तर्फेंच या नाटकाचा प्रथम प्रयोग होत आहे.

नाशिकचे नाट्यप्रेमी श्री. बाळासाहेब काळे यांनींसुद्धां नाटकाच्या लेखनास सुरवातीपासून साहाय्य केलें आणि आपल्या दिग्दर्शन-कौशल्याचा फायदा देऊन नाटक रंगभूमीवर आणलें. वेगवेगळ्या अडचणींशीं झगडून आणि पडतील ते परिश्रम घेऊन त्यांनीं फार आत्मीयतेनें कार्य केलें. त्याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करणें त्यांच्या स्नेहदृष्टीला कदाचित् आवडणार नाहीं, पण तें करणें मला जरूर वाटतें. श्री. अंधृटकर यांनींही या नाटकासाठीं खूप परिश्रम केले. त्यांचे मी हार्दिक आभार मानतों.

नाटकाच्या छापील संसाराला नटनटीच प्रत्यक्ष जिवंतपणा आणून देतात. तें कार्य उत्साहानें केल्याबद्दल नाटकांतील सर्व कुशल कलावन्तांचा मी अत्यंत आभारी आहें.

वि. वा. शिरवाडकर

नाशिक, जानेवारी १९४६

## नाट्यव्यक्ति

**विश्राम** : प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांतील एक मंत्री

**सौदामिनी** : त्याची पत्नी

**पुष्पा** : त्याची बहीण

**सदानंद** : त्याचा मित्र

**रावबहादुर [ बाबासाहेब ]** : सदानंदचे वडील

**तारामती** : एक धाडसी व बुद्धिमान् स्त्री

**सरदार टेंबे** : एक छोटेसे 'चीफ'

शिवाय भीमराव, चिंतामणि, लतिका, प्रमिला, सुरेंद्र, महादेव वगैरे

या नाटकाचा प्रथम प्रयोग मुंबईतील मराठी
नाट्य-वार्षिकोत्सवांत १९४६ सालीं झाला.
त्यांत भूमिका करणारांचीं नांवें

**विश्राम** : श्री. टाकळकर
**सदानंद** : श्री. अनंत वर्तक
**रावबहादुर** : श्री. म. वि. काळे
**सौदामिनी** : सौ. नलिनीबाई डेरे
**तारामती** : सौ. प्रमोदिनी चित्रे, एम्. ए., बी. टी.
**पुष्पा** : कु. कमल कुलकर्णी
**सरदार** : श्री. राघवदास म्हात्रे
**भीमराव** : श्री. शेणई

शिवाय साटम, दीक्षित, देशपांडे, सौ. कुलकर्णी, सौ. पडवळ वगैरे

**दिग्दर्शक** : श्री. म. वि. काळे
**निर्मिती** : मराठी नाट्यालय

# १

[ प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांतील मुंबईचे एक मंत्री विश्राम देशमुख यांच्या घरांतील एक प्रशस्त दिवाणखाना. दिवाणखान्याच्या तिन्ही बाजूंस तीन दरवाजे आहेत. डावीकडील दरवाजा बाहेरच्या व्हरांड्यासाठीं, उजवीकडचा घरांतल्या आंतील दालनांसाठीं आणि समोर मागच्या बाजूस दिसणारा दरवाजा घराभोवतीं असलेल्या बागेंत जाण्यासाठीं.

दिवाणखान्यांत कोच, खुर्च्या, वगैरेंची व्यवस्थित मांडणी केलेली असून एका कोपऱ्यांत रेडियोचा स्टँड आहे. भिंतीवर दोन मोठीं चित्रें आहेत. एकंदर रचनेंत वैभवापेक्षां साधेपणा दाखविण्याची वृत्तिच जास्त स्पष्ट आहे.

वेळ संध्याकाळची. नेहमीं येणारी कांहीं स्त्रीपुरुष मंडळी आणि विश्रामची धाकटी बहीण पुष्पा हीं दिवाणखान्यांत बसलेलीं आहेत. रेडियोवरती एक गीत चालू असतें. तें संपतांच पुष्पा उठते आणि रेडियो बंद करते.

त्याच वेळीं संस्थानी गणवेष परिधान केलेला एक शिपाई बाहेरील दारांतून प्रवेश करतो. ]

**शिपाई :** [ललकारी देत] चंद्रपूरचे राजेसाहेब, खड्गबहादुर भारतभूषण श्रीमंत सरकार सरदार प्रतापराव टेंबे.

[सर्वजण कुतूहलानें दरवाजाकडे बघतात. सरदार टेंबे संथपणें आंत येतात आणि शिपाई बाहेर जातो.]

**पुष्पा :** [पुढें होऊन] या, सरदारसाहेब.

**सरदार :** [कोचावर बसून] आम्हीं ही ललकारी देण्याची पद्धत मुद्दामच सुरू केली. नाहीं तर होतं काय, चंद्रपूरच्या बाहेर आम्ही कोण आहोंत हें प्रजाजनांच्या ध्यानीं येत नाहीं आणि त्यामुळें त्यांचा गैरसमज होतो. एकदा आम्ही ऑपेरा हाऊसमध्यें एक ऐतिहासिक नाटक पाहायला गेलों आणि भोवतालच्या लोकांना वाटलं हे कुणी नाटकांतलेच राजे प्रेक्षकांत येऊन बसले! अशी कांहीं मौज झाली!

**पुष्पा :** राणीसाहेब नाहीं आल्या वाटतं बरोबर?

**सरदार :** राणीसाहेब आल्या नाहींत आणि येणारही नव्हत्या. मेक्सिकन जातीचीं दोन नवीं कुत्रीं त्यांना नुकतींच मिळाल्यामुळें त्यांचं आमच्याकडे आणि राज्याकडे सध्यां लक्ष नाहीं. द्विपादांपेक्षां चतुष्पादांबद्दल त्यांना जास्त प्रेम वाटतं. असो. नशीब एखाद्याचं! पण पुष्पाताई, राणीसाहेब यायच्या नाहींत हें अगोदर आम्हीं कळवलं होतं. तारामतीबाई देसाई ह्यांना बरोबर घेऊन येऊं म्हणून सुद्धा सांगितलं होतं. रीतिरिवाजांत आम्ही कधीं चुकायचे नाहीं.

**पुष्पा :** पण कुठें आहेत तारामतीबाई देसाई?

**सरदार :** त्यांच्यासाठीं आम्हीं वाट पाहिली पण त्या आल्या नाहींत. आतां इकडेच बहुधा परस्पर येतील. विश्रामना भेटायला फार उत्सुक आहेत त्या. [इतर मंडळीची ओळख करून घेण्यासाठीं] ह्या बाईसाहेब...

**पुष्पा :** ह्या दिवाणबहादुर सामंतांच्या पत्नी प्रमिलाबाई, ह्या इथल्या कन्याशाळेच्या प्रिन्सिपल लतिकाताई ओक, हे महाराष्ट्रांतले एक मोठे कादंबरीकार प्रो. चिंतामणि आणि हे प्रख्यात चित्रकार सुरेंद्र. [सर्वांना उद्देशून] हे कोण आहेत हें ह्यांच्या शिपायानें सांगितलंच आहे.

**लतिकाताई :** कुणीकडे आहे आपलं संस्थान? प्रांताच्या नकाशांत तर चंद्रपूरचं नांव कधीं दिसलं नाहीं.

**पुष्पा :** ह्यांचं संस्थान आहे बेळगांवच्या बाजूला. तसं संस्थान म्हणतां येणार नाहीं, जहागिरींतच जमा आहे.

**सरदार :** हो, पण तशी जहागिरीही म्हणतां येणार नाहीं. खरं म्हणजे संस्थानांतच जमा व्हायला हवं तें. पण हे नकाशे लिहिणारे लोक मोठे उर्मट असतात. आम्हीं त्यांना अनेकदा विनंती केली, कीं चंद्रपूरच्या नांवानें एक पिवळा ठिपका टाकून द्या म्हणून. पण ऐकतच नाहींत... [चितामणीकडे वळून] आपण कांहीं नकाशे वगैरे लिहितां का ?

**चिंतामणि :** नाहीं, अजूनपर्यंत मीं कादंबऱ्याच लिहिल्या आहेत. कादंबरींत कधीं कधीं नकाशे घालतों, पण ते कादंबरींतले नकाशे. त्यांत चंद्रपूर संस्थान येऊं शकणार नाहीं.

**पुष्पा :** खरं म्हणजे कादंबरींतल्या नकाशांतच तें येऊं शकेल !

**सरदार :** [आशेनें सुरेंद्राकडे वळून] आपण निदान नकाशे रंगवीत असाल ?

**सुरेंद्र :** नाहीं सरदारसाहेब, ती कला अद्याप मला साध्य झालेली नाहीं !

**सरदार :** [उसासा टाकून] आमच्या महत्त्वाकांक्षेच्या मार्गांत नेहमीं असे अडथळे उत्पन्न होतात ! बारा बंदुकांसाठीं आम्हीं आकाशपाताळ एक केलं तर सरकारनं आम्हांला अकराच बंदुकांची परवानगी दिली. चांगला भाव आला म्हणून संस्थानची गाडी नंबर दोन आम्हीं विकून टाकली तर इकडे गाडी नंबर एक जळून खाक झाली. नाहीं म्हणायला रावबहादुरांच्या कृपेमुळें आम्ही सेकंड क्लासचे फर्स्ट क्लास सरदार मात्र झालों. मोठा कणखर आणि जाज्वल्य पुरुष रावबहादुर म्हणजे. सध्या पुण्यालाच आहेत ना ते ?

**पुष्पा :** पुण्याला असतात, पण इथें आले आहेत आज ते. येतील इकडे आतां.

**लतिकाताई :** [किंचित् हसून] पुष्पा, रावबहादुर म्हणजे आपल्या सदानंदांचे वडीलच, होय ना ?

**पुष्पा :** हो, तेही यायला हवेत आतां.

**लतिकाताई :** ते तर अधिकच यायला हवे असतील ?

**पुष्पा :** विश्रामदादाच्या घरांत असा पंक्तिप्रपंच होऊं शकत नाहीं !

**सरदार :** विश्रामच्या घरांत पंक्तिप्रपंच ही गोष्टच अशक्य ! विश्राम म्हणजे एक उमद्या अंतःकरणाचा महात्मा आहे. एवढ्या मोठ्या मुंबई प्रांताचा मंत्री तो,

प्रजाजनांत मानमरातब इतका कीं त्याला नुसतं पाहाण्यासाठीं लोकांची यात्रा जमते. पण अभिमान किंवा अहंकार म्हणाल तर काडीइतका नाहीं. इतक्या शुद्ध दानतीचा आणि उदार अंतःकरणाचा पुढारी आमच्या कर्नाटकांत एक सुद्धा नाहीं. चीफसाहेब ही पदवी मिळवण्यासाठीं आम्ही आतां त्यांच्याच तर्फे खटपट करणार आहोंत.

**प्रमिलाबाई :** विश्रामबद्दल आपण म्हणतां तें अगदीं खरं आहे सरदारसाहेब. दिवाणबहादुर सुद्धा नेहमीं म्हणतात कीं विश्राम आणि सौदामिनी हीं माणसं म्हणजे सत्ययुगानें कलियुगाकडे पाठवलेले आपले प्रतिनिधि आहेत.

**चिंतामणि :** सौदामिनीबाई तर विश्रामहूनही कांकणभर सरसच आहेत !

**सुरेंद्र :** राहातां राहिल्या पुष्पाताई...

**पुष्पा :** मी आपली कलियुगांतली आहें आणि कलियुगाचाच मला अभिमान वाटतो. सत्याइतकी कटु आणि तापदायक गोष्ट दुसरी क्वचितच असेल. सत्ययुगांत मी जन्माला आलें असतें तर जीव देण्याचाच प्रसंग ओढवता माझ्यावर !

**लतिकाताई :** [पुष्पाकडे चेष्टेनें पाहात] सदानंद अजून आले नसले तरी आल्यासारखेच वाटताहेत !

**पुष्पा :** छे, ते आले तरी आल्यासारखे वाटत नाहींत !

**लतिकाताई :** इतक्या लवकर निघून जातात ते ?

[सरदारांशिवाय इतर सर्व हसतात.]

**सरदार :** विश्राम कुठें आहेत ?

**पुष्पा :** विश्रामदादा आंत आहे. राजकारणाच्या चर्चेमुळें तिथल्या बैठकीला तिसऱ्या पानिपतचं स्वरूप आलं आहे. आम्ही सारे नाना फडणिसासारखे शहाणे म्हणून तिथून जीव घेऊन इकडे पळून आलों !

**प्रमिला :** खरंच बाई, राजकारणाइतकी दुसरी कोणतीच गोष्ट कंटाळवाणी नाहीं ! दिवाणबहादुरांचं सारं आयुष्य राजकारणांत गेलं, पण ते सुद्धा आतां म्हणतात कीं राजकारण हें डोंगरासारखं दुरूनच साजरं दिसतं !

**लतिकाताई :** आणि सध्या तर जिकडे पाहावं तिकडे राजकारण ! आमच्या शाळेंतल्या चिमुरड्या मुली सुद्धा अभ्यासापेक्षां राजकारणच अधिक करतात !

**चिंतामणि :** शाळेचं राहो, आयुष्याचा अपव्यय करण्याचीच ती जागा आहे! परंतु आमच्या कादंबऱ्यांतून सुद्धा राजकारणानें धुमाकूळ घातला आहे. राजकारणाशिवाय मराठी कादंबरीचं एकही पान सध्या हालत नाहीं.

**पुष्पा :** त्यासाठीं हल्लीं मी मराठी कादंबऱ्यांच्या अर्पणपत्रिकाच फक्त वाचतें. त्यामुळें मनोरंजन तर होतंच, पण शिवाय कादंबरीच्या मानानें त्या जरा सुटसुटीतही वाटतात!

**सरदार :** आमचं मत वेगळं आहे. राजकारण म्हणजे आमचा जीव कीं प्राण आहे. आमच्या दिवाणाकडून रोज सकाळीं आम्ही सारीं वर्तमानपत्रं वाचून घेतों आणि दिवसभर त्यावर विचार करतों. शिवाय आमच्या संस्थानचं राजकारण असतं तें वेगळंच. राजकारणाशिवाय गंमत नाहीं.

**चिंतामणि :** संस्थानी राजकारणांत नेहमींच गंमत असते.

**पुष्पा :** नुसतीच गंमत असते, राजकारण नसतंच त्यांत!

**प्रमिलाबाई :** आमचे दिवाणबहादुर नेहमीं म्हणतात कीं राजकारण म्हणजे भामट्यांचं अखेरचं आश्रयस्थान आहे!

**सुरेंद्र :** दिवाणबहादुरांच्या अगोदर तें जॉन्सननें म्हटलं आहे. पण तितकं खरं नाहीं तें. राजकारणांत भामटेपणाला अवसर आहे त्याचप्रमाणें ध्येयनिष्ठेला आणि सेवावृत्तीलाही आहे. विश्रामचंच उदाहरण घ्या. सर्व सद्गुणांच्या संमेलनाला विश्राम हें नांव दिलं तरी अतिशयोक्ति होणार नाहीं.

**लतिकाताई :** थोडीशी होईल. कारण त्या संमेलनाचं नांव अगोदरच ठरलेलं आहे आणि तें म्हणजे सौदामिनी.

**पुष्पा :** ह्या घरांत आल्यावर विश्राम-सौदामिनीची स्तुतिच केली पाहिजे असा कांहीं कायदा नाहीं!

**चिंतामणि :** जे स्तुतीला पात्र नाहींत त्यांची स्तुति करण्यासाठीं कायदे करावे लागतात. विश्रामसारख्यांची स्तुति, स्तुति करूं नये असा कायदा असला तरी कायदेभंग करून करावी लागेल, पुष्पाताई.

**पुष्पा :** तुमच्या पुढच्या कादंबरींत तो येणार आहे वाटतं?

**चिंतामणि :** कोण? विश्राम?

**पुष्पा :** नव्हे, कायदेभंग?

**चिंतामणि :** कायदेभंग येणार नाहीं. पण विश्राम मात्र जरूर येऊं शकेल. एखाद्या महान् कादंबरीचा किंवा नाटकाचा धीरोदात्त नायक व्हायला विश्राम निःसंशय पात्र आहेत.

[ चिंतामणि बोलत असतांच आंतील दरवाजावरील पडदा दूर करून सौदामिनी प्रवेश करते. सौदामिनी सुंदर आहे परंतु सौंदर्य हें तिचें वैशिष्ट्य नव्हे. तिच्या अंतःकरणांतील सद्भावना आणि जगांतील चांगल्या गोष्टींवरील करारी श्रद्धा तिच्या चेहेऱ्यावर प्रतिबिंबित झालेली आहे. तिच्या हालचालींत संथपणा आणि संयम आहे. ]

**सौदामिनी :** [ स्मित करून ] विश्राम नायक झाले तर मलाही त्या कादंबरींत किंवा नाटकांत नायिका म्हणून प्रवेश करावा लागेल !

**चिंतामणि :** विश्रामच्या अगोदर तुमचाच प्रवेश होईल सौदामिनीताई !

**सौदामिनी :** तुम्ही केव्हां आलांत सरदारसाहेब ?

**सरदार :** आतांच आलों. आम्ही तुमचीच वाट पाहात होतों. ही सर्व मंडळी आमच्यावर तुटून पडली आहे !

**सौदामिनी :** तुमच्यावर तुटून पडली आहे ?

**सरदार :** आमच्यावर म्हणजे राजकारणावर. राजकारण म्हणजे आमचा जीव कीं प्राण असल्यामुळें...

**पुष्पा :** कुणी राजकारणावर बोलूं लागलं कीं चंद्रपूर संस्थानच्या अकराही बंदुका आपल्यावर रोखून धरल्या आहेत असं वाटतं सरदारसाहेबांना !

**सरदार :** ह्या मंडळीचं म्हणणं असं कीं राजकारण म्हणजे भामट्यांचा बाजार !

**सौदामिनी :** चोरांच्या कर्तबगारीला देवळांत सुद्धा अवसर असतो. म्हणून देवळाचं पावित्र्य कांहीं कमी होत नाहीं किंवा देऊळ म्हणजे चोरांचं आश्रयस्थान असंही ठरत नाहीं. ज्या राजकारणानें सर्व समाजाचं कल्याण साधतां येतं, दुष्टांचं पारिपत्य करतां येतं आणि सज्जनांचं, सद्वृत्तींचं संरक्षण करतां येतं, तें हीन आहे असं कुणालाच म्हणतां येणार नाहीं.

**चिंतामणि :** हें अगदीं आदर्श राजकारण झालं ! आणि जीवनांतले सारे आदर्श हिमालयाच्या अत्युच्च शिखरांसारखे अजिंक्य असतात.

**सौदामिनी :** हिमालयाचं अत्युच्च शिखरही अजिंक्य नाहीं! श्रद्धेचं सामर्थ्य अंतःकरणांत असेल तर कुठल्याही आदर्शाचा गौरीशंकर माणूस चढून जाऊं शकतो. जे पायथ्याशीं कोलमडून पडतात, ते आपल्या दुर्बळपणामुळें, निष्ठेचं सामर्थ्य नसल्यामुळें कोलमडतात. श्रीकृष्णापासून गांधींपर्यंत अनेक विभूतींनीं हें सिद्ध केलं आहे कीं जगाच्या कल्याणासाठीं राजकारणाचाच आश्रय घ्यावा लागतो.

**पुष्पा :** आणि गौतमबुद्धासारख्या विभूतीनें हेंही सिद्ध केलं आहे कीं जगाच्या कल्याणासाठीं राजकारणांतून पळावं लागतं!

**सौदामिनी :** गौतमबुद्ध राजकारणांतून पळाले नाहींत, राजवाड्यांतून! त्यांनीं राजकारणाचा त्याग केला नाहीं, उलट आपल्या धर्माचा प्रसार करण्यासाठीं त्याचा उपयोग करून घेतला. परंतु दुष्ट लोक कोणत्याही चांगल्या गोष्टीचा दुरुपयोग करूं शकतात, तसा ते राजकारणाचाही करीत असतील; नव्हे करतातही. तो दोष राजकारणाचा नाहीं. आत्तांच आंत चर्चा चालली होती; कर्नाटकांत निरनिराळे कारखाने उभारण्यासाठीं 'कर्नाटक इंडस्ट्रीज्' म्हणून जी नवीन कंपनी निघाली आहे...

**प्रमिलाबाई :** हो, वर्तमानपत्रांतून पानंच्या पानं जाहिराती असतात तिच्या.

**सरदार :** मोठी खळबळ उडवून दिली आहे त्या कंपनीनें कर्नाटकामध्यें!

**सौदामिनी :** ह्या कंपनीला मुंबई सरकारनें आपला आशीर्वाद द्यावा, प्रत्यक्ष साह्याय्य करावं म्हणून कंपनीचे प्रचारक विश्रामच्या मागें हात धुऊन लागले होते. परंतु गोरगरिबांच्या माना मुरगळण्यासाठीं, भोळ्या धनिकांवर दरोडे घालण्यासाठीं, लोकांना केवळ फसवण्यासाठीं ह्या कंपनीचा डोलारा उभा करण्यांत आला असल्यानें विश्रामनें त्यांना साफ नकार दिला. इतकंच नव्हे तर परवां कायदेमंडळांत भाषण करून ह्या कंपनीबाबत ते लोकांना स्पष्ट इशारा देणार आहेत. लक्षावधि लोकांना ह्या लुटारूंपासून वांचवल्याचं श्रेय विश्रामना मिळत आहे, मिळणार आहे, तें ते राजकारणांत आहेत म्हणूनच नाहीं का?

**लतिकाताई :** चांगलीं माणसं कुठेंही असलीं तरी त्यांच्यामुळें समाजाचं कल्याण होतं.

**सौदामिनी :** हें खरं नाहीं लतिकाताई. आपल्याच माणसाबद्दल फार बोलूं नये, पण जवळचंच उदाहरण म्हणून सांगतें. विश्रामनें आय्.सी.एस्.ची

नोकरी सोडण्याचं साहस केलं नसतं, आपल्या महत्त्वाकांक्षेची आणि ध्येयनिष्ठेची इथेंच पूर्तता झाली असं समजून ते त्या नोकरींतच समाधान मानीत राहिले असते...

**चिंतामणि :** तर आपले जन्माचे जोडीदार म्हणून सौदामिनीताईंनीं त्यांची निवड केली नसती !

**सौदामिनी :** [स्मित करून] कदाचित् नसतीही केली ! विश्राम हे विश्राम आहेत, माझ्या कल्पनेप्रमाणें एक आदर्श पुरुष आहेत म्हणूनच... पण तें जाऊं दे. विश्राम आय्. सी. एस्.च्या सोनेरी शृंखलेंत समाधान मानते तर लोकसेवा करण्याची, लोकनेता होण्याची त्यांना आज जी संधि मिळाली, ती मिळाली नसती.

[बाहेरच्या दरवाजांत रावबहादुर येऊन उभे राहातात. त्यांनीं साठी ओलांडली असली तरी त्यांच्या बुद्धीच्या कार्यक्षमतेबद्दल शंका घ्यायला मुळींच जागा नाहीं. नेमस्त राजकारणाच्या ऐन अमदानींतील लोकप्रिय पोषाख त्यांनीं आंगावर चढवलेला आहे. त्यांची शरीरयष्टी धिप्पाड आहे, मिशा मोठाल्या आहेत आणि दृष्टि भेदक आहे.]

**पुष्पा :** या बाबासाहेब, सगळेजण तुमची वाट पाहाताहेत.

**रावबहादुर :** [आंत येऊन चौफेर पाहात] आमचे कुलदीपक इकडे आले नाहींत वाटतं ?

**सौदामिनी :** नाहीं आले सदानंद अजून.

**पुष्पा :** बाबासाहेब, तुम्ही सदानंदांना नेहमीं कुलदीपक कां म्हणतां हो ?

**रावबहादुर :** कुलदीपकच आहेत ते ! त्यांच्याइतका देदीप्यमान् पुरुष आमच्या वंशामध्यें अजून झाला नाहीं, पुष्पा. रोज सकाळीं दहा वाजतां बिछान्यांतून बाहेर पडणारी त्याची मूर्ति पाहाण्यासाठीं आमचे बेचाळीसही पूर्वज आकाशांत उपस्थित होत असतील ! प्रत्यक्ष बापालाच मात्र त्याचं दर्शन दुर्लभ होऊन बसलंय्. लौकर जावं तर झोपलेले, उशीरां जावं तर बाहेर गेलेले ! सदानंदाचं सारं आयुष्य ह्या दोन कार्यांत, झोपण्यांत आणि बाहेर जाण्यांत खर्च होत आहे !

**पुष्पा :** बाहेर कामं असतील त्यांना. बायका घराबाहेर जाणं जितकं वाईट तितकंच पुरुष घरांत असणंही वाईट ! आदर्श स्त्री नेहमीं घरांत असते आणि आदर्श पुरुष नेहमीं घराबाहेर असतो.

**रावबहादुर :** आमच्या चिरंजिवांना काम आहे हें चारचौघांत जाहीर करणारी तूं पहिलीच दिसतेस मला! आणि पुष्पा, तुझ्या आदर्श स्त्रीपुरुषाच्या कल्पनाही आतां शनिवारवाड्याइतक्या जुन्या झाल्या आहेत. चिंतामणि तुला सांगतील, कीं जी स्त्री घराबाहेर पडते तीच आज आदर्श समजली जाते.

**चिंतामणि :** ती साहित्यांतली किंबहुना रंगभूमीवरील आदर्श स्त्री! रंगभूमि आणि व्यवहार ह्यांच्यांत नेहमींच एक मखमली पडदा उभा असतो.

**सौदामिनी :** बाबासाहेब, विश्राम तुमची मघांपासून वाट बघताहेत. कांहीं महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं तुमचा सल्ला हवा आहे त्यांना.

**सरदार :** आणि रावबहादुर, मी सुद्धा आपलीच वाट पाहात होतों. आमच्या संस्थानी राजकारणांत निर्माण झालेल्या कांहीं प्रश्नांबाबत मलाही आपला विचार घ्यायचा आहे. आपल्याला ठाऊक आहे, आम्हीं सरकारकडे बारा बंदुका मागितल्या पण सरकारनें आम्हांला अकराच दिल्या...

**रावबहादुर :** मुळांतच चूक केली तुम्हीं! तुम्हांला बारा बंदुका हव्या होत्या तर तुम्हीं तेरांची मागणी सरकारकडे करायला हवी होती, म्हणजे बारा मिळाल्या असत्या. मागणी नेहमीं जरूरीपेक्षां जास्त असावी. ठीक आहे. मी आतां विश्रामला भेटतों जरा. सरदारांना आमचा सल्ला हवा आहे, विश्रामला आमचा सल्ला हवा आहे. राष्ट्रीय लोकपक्षाची एकही सभा आमच्या सल्ल्याशिवाय पार पडत नाहीं. आमचा सल्ला नको आहे फक्त आमच्या चिरंजिवांनाच! दिव्याखालीं अंधार म्हणतात तो असा!

[आंत जातात.]

**सरदार :** आमचंच मुळांत चुकलं! रावबहादुर म्हणाले तेंच खरं आहे. बारा बंदुका हव्या होत्या तर तेरा बंदुका मागण्याची बुद्धि आम्हांला कां झाली नाहीं?

[हताशपणें डोळे मिटून मागें मान टाकतात. तारामती प्रवेश करते. ह्या बुद्धिमान् आणि व्यवहारचतुर स्त्रीनें अगदीं अद्ययावत् आणि डोळे दिपवणारी वेषभूषा केली आहे. आपला प्रवेश, आपली प्रत्येक हालचाल मनोहर, डौलदार करण्याचा ती प्रयत्न करते.]

**तारामती :** माझं नांव तारामती देसाई.

**सौदामिनी :** तारामती देसाई?

**सरदार :** [अकस्मात जाग आल्याप्रमाणें] तारामतीबाई देसाई? होय, सौदामिनीबाई, ह्याच त्या तारामतीबाई देसाई! मोठ्या मार्मिक आणि विद्वान आहेत. आमच्या कर्नाटकांत ह्यांच्यासारखी बुद्धिमान् स्त्री नाहीं दुसरी... [तारामतीला उद्देशून] ह्या सौदामिनीबाई, ह्या पुष्पाताई, ह्या ह्या...

**पुष्पा :** ह्या प्रमिलाबाई सामंत, ह्या लतिकाताई ओक, हे प्रो. चिंतामणि, हे चित्रकार सुरेंद्र...

**तारामती :** [सर्वांना लीनपणानें नमस्कार करून] इतकीं मोठीं माणसं एकदम भेटल्यावर माझ्यासारखी नवखी स्त्री बावरून गेली तर नवल नाहीं.

**सौदामिनी :** मला वाटतं तारामतीबाई, आपली भेट झाली आहे पूर्वी. पण त्या वेळीं तुमचं उपनांव देसाई नव्हतं.

**तारामती :** खरंच? मला तर आपली भेट झाल्याचं आठवत नाहीं. आणि तुमच्यासारख्यांची भेट झाल्यावर तिचा विसर पडणं अशक्य आहे. म्हणून मला वाटतं, तुमचा कांहीं तरी घोटाळा होत असावा. जगांत माणसं अगणित असलीं तरी माणसांचे प्रकार फार थोडे आहेत!

**सौदामिनी :** माझी कल्पना आहे कीं आपण एका शाळेंत होतों कांहीं दिवस.

**तारामती :** शाळेंत? मग बरोबर आहे. शाळेसंबंधींचं मी सारं कांहीं विसरून गेलें आहे.

**सौदामिनी :** [थोड्या खोचकपणानें] साहजिकच आहे.

**तारामती :** मला वाटतं माणसाच्या शिक्षणाला शाळेंतून बाहेर पडल्यावरच खरी सुरुवात होते. लतिकाताईचं मत अर्थात् वेगळं असणार.

**लतिकाताई :** होय. शाळेसंबंधीं इतकं निराश होऊन मला चालणार नाहीं. शाळेंत, विद्यार्थी नाहीं तरी शिक्षक मात्र जरूर कांहीं तरी शिकत असतात!

**सौदामिनी :** [पूर्वीच्याच स्वरांत] माणसाला काय शिकायचं ह्यावर हें अवलंबून आहे. कांहीं लोकांना हवं असलेलं शिक्षण देण्याची सोय सुदैवानें अद्याप तरी शाळेमध्यें नाहीं!

**तारामती :** आणि कांहीं लोकांना...[हसून] पण जाऊं दे तें. सौदामिनीबाई, तुम्हांला आणि विशेषतः विश्रामना भेटण्यासाठीं मी फार उत्सुक झालें होतें. लोकांच्या प्रेमाला आणि प्रशंसेला पात्र होणारीं अनेक थोर माणसं असतात.

परंतु थोरपणा हा कांहीं विश्रामचा एकच विशेष नाहीं. त्यांची बुद्धिमत्ताही फार प्रखर आहे. अशा माणसांना भेटण्याचा, त्यांच्याशीं बोलण्याचा मोह मला अगदीं अनावर होतो. [बोटांतील आंगठी चाळवीत] म्हणून ह्या वेळेला बेळगांवहून येतांना मीं अगदीं संकल्प केला होता विश्रामना भेटायचा.

[महादेव येतो.]

**महादेव :** बाईसाहेब, बागेंत चहाची तयारी आहे.

**सौदामिनी :** चला, आपण सर्वजण बागेंत जाऊं. विश्राम तिकडेच येतील.

[पुष्पाशिवाय इतर सर्व मागच्या बाजूस
असलेल्या दरवाजांतून बाहेर जातात.]

**पुष्पा :** [अस्वस्थपणें दाराकडे आणि नंतर आरशाकडे पाहात] कधीं वेळेवर येतील तर शपथ! आयुष्यांत प्रत्येक गोष्टीला उशीर करण्याचा विडाच उचलला आहे सदानंदांनीं.

[सदानंद आंत येतो. सदानंद हा तिशीच्या पलीकडे गेलेला आणि वेषाकडे विशेष लक्ष देणारा तरुण आहे. जीवन ही एक वाया दवडण्याची गोष्ट आहे असें तो बोलण्यावरून भासवीत असला तरी त्याच्याही अंतःकरणांत कांहीं निष्ठा, कांहीं तत्त्वज्ञान आहे.]

**पुष्पा :** शंभर वर्षांचं आयुष्य आहे तुम्हांला! शंभर वर्षं तुम्हांला उशीर करण्याची संधि लाभणार आहे!

**सदानंद :** त्याचं असं झालं पुष्पा, मी जन्माला आलों तोच थोडासा उशीरां आलों. त्यामुळें उशीर करण्याची माझी ही सवय जन्मसिद्ध आहे. मी वेळेवर, म्हणजे टिळक-आगरकरांच्या काळांत जन्माला आलों असतों तर...

**पुष्पा :** तर काय टिळक-आगरकरांसारखे महापुरुष झालां असतां?

**सदानंद :** तर महापुरुष होण्याची जबाबदारी माझ्यावर राहिली नसती! त्या काळांत महाराष्ट्रामध्यें मोठ्या माणसांची संख्या फार मोठी असल्यामुळें लहान माणसं सुखानें, निर्वेधपणानें जगत होतीं. आपण कांहीं केलं नाहीं तर समाज रसातळाला जाईल अशी रुखरुख कुणाच्याच मनाला लागण्याचं कारण नव्हतं. आज सर्वच माणसं लहान असल्यामुळें आपण कांहीं तरी केलं पाहिजे असं उगाचच वाटत राहातं! पण तूं एकटीच कशी इथें?

**पुष्पा :** कां? मी इथें एकटी आहें म्हणून तुम्हांला वाईट वाटतं आहे कीं काय?

**सदानंद :** स्त्री एकटी असलेली पाहून कोणत्या पुरुषाला वाईट वाटेल, पुष्पा ?

**पुष्पा :** विसाव्या शतकांतले कपडे आंगावर चढवतां पण तुमचे विचार अगदीं पाषाणयुगांतल्या माणसासारखे आहेत !

**सदानंद :** साहजिकच आहे. सुधारणेनें वेष बदलतात आणि संस्कृतीनें शब्द बदलतात ; माणसाचं अंतःकरण मात्र कशानेंच बदलत नाहीं.

**पुष्पा :** स्त्रियांकडे अशा वाईट दृष्टीनं पाहाणं चांगलं वाटतं ?

**सदानंद :** स्त्रीकडे चांगल्या दृष्टीनं पाहाणं हेंच फार वाईट आहे. त्यांत स्त्रीचाही अपमान आहे आणि पुरुषाचाही अपमान आहे. प्रामाणिक पुरुष स्त्रीकडे नेहमीं वाईट दृष्टीनेंच पाहात असतो आणि प्रामाणिक स्त्रीला त्यामुळें आनंदही व्हायला हवा. परंतु आजचं युगच अप्रामाणिकपणाचं आहे. प्रत्येकजण तोंडावर साधुत्वाचा मुखवटा घालतो आणि हातानें करायचं अथवा करायचं नाहीं तें करीत राहातो... बरं, बाकीची मंडळी कुठें आहे ?

**पुष्पा :** बागेंत चहा घेत आहेत.

**सदानंद :** मग तूं एकटीच कां इथें राहिलीस ?

**पुष्पा :** खाण्यापिण्यापेक्षां कांहीं अधिक महत्त्वाच्या गोष्टी अस्तित्वांत आहेत असं मी समजतें !

**सदानंद :** केवढा गैरसमज !

**पुष्पा :** तो तुमचाही झालेला दिसतो. नाहीं तर इतका उशीर झाला नसता इकडे यायला !

**सदानंद :** त्याच कार्यात मी इतरत्र व्यग्र होतों, पुष्पा. म्हणूनच उशीर झाला थोडासा.

**पुष्पा :** थोडासा ! पांच वाजतां येईन म्हणाले होतेत. सात वाजून आतां आठ वाजायची वेळ आली आहे !

**सदानंद :** माझी कुणी वाट पाहात होतं का ?

**पुष्पा :** छे, कुणी सुद्धा नाहीं !

**सदानंद :** मग मी लवकर आलों नाहीं हें खरोखरच वाईट झालं. कुणीतरी आपली वाट पाहात असेल तरच उशीरां जाण्यांत स्वारस्य असतं ! एरव्हीं वेळेवरच गेलेलं बरं.

**पुष्पा :** किती स्वार्थी आहांत तुम्ही !

**सदानंद :** मी फार स्वार्थी आहें हें खरं आहे.

**पुष्पा :** माझ्यासमोर तुम्ही नेहमीं आपल्या दुर्गुणांची मोजदाद करीत असतां !

**सदानंद :** मोजदाद होण्याइतके ते थोडे नाहींत ! ते इतके आहेत आणि अशा प्रकारचे आहेत कीं रात्रीं त्यांच्यासंबंधीं विचार करूं लागलों कीं मला झोपच येते !

**पुष्पा :** तुमचं सारं आयुष्य झोपण्यांत आणि बाहेर भटकण्यांत खर्च होत आहे असं रावबहादुर आतांच म्हणत होते.

**सदानंद :** बाबासाहेब आले आहेत ?

**पुष्पा :** हो. तुम्ही त्यांचा सल्ला घेत नाहीं म्हणून फार रागावले आहेत ते तुमच्यावर !

**सदानंद :** मुलाचीं सोळा आणि बापाचीं साठ वर्षं उलटलीं कीं मुलाचाच सल्ला बापानें घ्यावा असं मत आहे माझं. आणखी कोण आलंय् ?

**पुष्पा :** नेहमींचीच मंडळी. हो, विसरलें. त्या एक तारामतीबाई देसाई आल्या आहेत.

**सदानंद :** [एकदम गंभीर होऊन] तारामती देसाई ? बेळगांवच्या ?

**पुष्पा :** हो, बेळगांवच्याच वाटतं. आपल्या सरदारांच्या ओळखीनेंच आल्या.

**सदानंद :** कशाकरतां आल्या त्या इथें ?

**पुष्पा :** विश्रामचं दर्शन घ्यायला म्हणे. तुम्हांला माहिती आहे त्यांची ?

**सदानंद :** थोडीशी आहे.

**पुष्पा :** कशी आहे ती बाई ?

**सदानंद :** ठीक आहे. दिवसा विदुषी आणि रात्रीं रमणी !

**पुष्पा :** सुदैवानें आतां दिवसही नाहीं आणि रात्रही नाहीं. बाकी रात्र झालीच म्हणा. [दिवा लावते.] हें काय पडलंय् इथें ? अय्या ऽ हिऱ्याची आंगठी ! कुणाची तरी गळून पडलेली दिसते !

**सदानंद :** आपल्या आवडत्या गोष्टी हरवण्यांत बायका पारंगतच असतात.

**पुष्पा :** [आंगठीकडे पाहात] किती सुंदर सर्पाकृति आहे ही ?

**सदानंद** : [दचकून] सर्पाच्या आकृतीची आंगठी आहे ती? आणि फण्यांत...

**पुष्पा** : फण्यांत पिवळसर हिरा जडवलेला आहे.

**सदानंद** : बघूं जरा. [आंगठी घेतो आणि बारकाईनें पाहातो.]

**सदानंद** : [आंगठी खिशांत घालून] पुष्पा, तुला एक विनंती करायची आहे.

**पुष्पा** : [अधीरतेनें] खरंच? कोणती?

**सदानंद** : ही आंगठी सापडली आहे किंवा ती माझ्याजवळ आहे हें कुणालाही सांगायचं नाहीं.

**पुष्पा** : [निराशेनें] हीच विनंती? ठीक आहे!

**सदानंद** : कुणी आंगठीचा शोध करायला आलं तर मला कळव ताबडतोब.

**पुष्पा** : इतकं त्या आंगठीबद्दल प्रेम कां तुम्हांला?

**सदानंद** : एका प्रेमाच्या माणसाला मीं ती नजर केली होती!

**पुष्पा** : [रोषानें] अस्सं! बरं, जातें मी.

**सदानंद** : आणि मी इथें एकटाच बसूं?

**पुष्पा** : त्या प्रेमाच्या माणसाचं स्मरण करीत बसा!... बाकी तेंही करायची जरूर नाहीं. तीं पाहा, विश्रामदादा आणि त्या बेळगांवच्या तारामतीबाई येताहेत इकडे. सगळी मंडळी जाऊन ही एकटीच शिल्लक राहिलेली दिसते.

[जाऊं लागते.]

**सदानंद** : मीं सांगितलेलं विसरूं नकोस.

**पुष्पा** : [एकदम मागें वळून] कुठें काय सांगितलं तुम्हीं?

**सदानंद** : एवढ्यांतच विसरलीस? त्या आंगठीबद्दल.

**पुष्पा** : आंगठीबद्दल! विसरलेंच होतें. आतां नाहीं विसरणार.

[पुष्पा आंत जाते. बागेच्या दरवाजांतून विश्राम आणि तारामती येतात. अधिकार आणि नेतृत्व मिळवण्यासाठींच कांहीं माणसें जन्माला आल्यासारखीं वाटतात. विश्राम अशा माणसांतच जमा आहे. सदानंदापेक्षां तो वयानें थोडा आणि कर्तृत्वानें त्याच्यापेक्षां खूपच मोठा आहे. त्याचा वेष साधा आणि घरगुती आहे.]

**विश्राम :** सदानंद, मला वाटलं एखाद्या नाट्यप्रयोगाचं उद्घाटन करायला किंवा सामन्यांचीं बक्षिसं वाटायला तूं गेला असावास! तारामतीबाई, हा माझा मित्र सदानंद, रावबहादुरांचा...

**तारामती :** मी ओळखतें त्यांना. ते मला ओळखतात कीं नाहीं कुणाला ठाऊक?

**सदानंद :** मीही ओळखतों. सुंदर स्त्रियांचा विसर पडण्याइतकं माझं वय झालं नाहीं अजून.

**तारामती :** दिवसा बायकांच्या बुद्धिमत्तेची आणि रात्रीं त्यांच्या सौंदर्याची चाणाक्ष पुरुष स्तुति करीत असतात. तुम्ही चाणाक्ष आहांत ह्यांत शंका नाहीं.

**सदानंद :** ह्या अभिप्रायाबद्दल मी आभारी आहें. कारण एरव्हीं होतं काय, पुरुषांना बायकांचं सौंदर्य समजतं पण बायकांना पुरुषांची बुद्धिमत्ता मात्र कधींच कळून येत नाहीं. आणि त्यामुळें त्यांच्यांतील स्तुतीचा सामना नेहमीं एकतर्फी होतो. एकतर्फी प्रेमाप्रमाणें एकतर्फी स्तुतिही फार काळ टिकूं शकत नाहीं.

**तारामती :** तुम्हीं अजून लग्न केलं नाहीं वाटतं?

**सदानंद :** नाहीं. बरेच दिवस प्रेम करीत राहिल्यामुळें लग्न न करतां नुसतं प्रेमच करावं असं वाटूं लागलं आहे मला.

**विश्राम :** तारामतीबाई, सदानंद म्हणजे मुंबईकरांचा खास प्रतिनिधि आहे. नेहमीं चांगले कपडे घालतो आणि वाईट विचार करतो!

**सदानंद :** किती दिवस आहांत मुंबईंत?

[जायला उठतो.]

**तारामती :** अनिश्चित आहे तें. तें थोडंसं सरदारगृहांतल्या जेवणावर, थोडंसं मुंबईच्या हवेवर आणि... बरंचसं विश्रामवर अवलंबून आहे!

**विश्राम :** [हसून] माझ्यावर? तुमचं जाणं माझ्यावर अवलंबून असेल तर तुम्ही लौकर जाणार नाहीं ह्याची काळजी घेणं हें माझं कर्तव्य आहे.

**सदानंद :** मी बाबासाहेब आहेत का पाहातों. एकाच घरांत पितापुत्राची भेट झाली नाहीं असं व्हायला नको.

[आंत जातो.]

**तारामती :** माझं जाणं खरोखरच तुमच्यावर अवलंबून आहे. किंबहुना, केवळ तुम्हांला भेटण्यासाठीं नव्हे, तर एका विशिष्ट हेतूनें तुमची भेट घेण्यासाठीं मी बेळगांवहून इथें आलें. [बसते.]

**विश्राम :** [ एका खुर्चीवर बसून पाइप पेटवतो. ] तुमची भेट झाली तेव्हांच तें मीं ओळखलं. करतां येण्यासारखी कोणतीही गोष्ट मी तुमच्यासाठीं जरूर करीन.

**तारामती :** ही गोष्ट तुम्हांलाच करतां येण्यासारखी आहे आणि म्हणूनच मी तुमच्याकडे आलें. 'कर्नाटक इंडस्ट्रीज्' संबंधीं मला बोलायचं आहे.

**विश्राम :** कर्नाटक इंडस्ट्रीज्? किती रुक्ष विषय काढलात हा बोलायला?

**तारामती :** रुक्ष विषयांतही कर्तबगार माणसाला रस निर्माण करतां येतो, नाहीं का? आणि हा विषय माझ्या स्वतःच्या दृष्टीनें तर रुक्षही नाहीं.

**विश्राम :** तारामतीबाई, तुमचा त्या कंपनीशीं कांहीं संबंध आहे?

**तारामती :** होय.

**विश्राम :** मग तो संबंध तोडून टाका आणि त्या थोतांडापासून चार पावलं दूर राहा, इतकाच सल्ला मी तुम्हांला देऊं शकतों.

**तारामती :** त्यांत थोतांड काय आहे? व्यापारी जगांतलं तें एक मोठं साहस आहे.

**विश्राम :** माझ्या माहितीप्रमाणें संभावित दरोडेखोरीचं तें एक मोठं कारस्थान आहे! आणि माझी माहिती अपुरी नाहीं अथवा चुकीचीही नाहीं.

**तारामती :** तें कांहीं असलं तरी मीं त्यांत खूप मोठी रक्कम गुंतवली आहे.

**विश्राम :** कुणीं सल्ला दिला तुम्हांला हा?

**तारामती :** तुमच्या एका मित्रानें आणि अर्थात् माझ्याही!

**विश्राम :** माझ्या मित्रानें?

**तारामती :** सर विश्वनाथ डोंगरे.

**विश्राम :** सर विश्वनाथ डोंगरे! [ जरा घोटाळतो. ] होय, त्यांच्या अखेरच्या दिवसांत त्यांनीं ह्या प्रकरणाला हातभार लावला होता हें खरं आहे... तारामतीबाई, ह्या विषयावर बोलतां येण्यासारखं फार थोडं आहे. चला, मी तुम्हांला आमचं वाचनालय दाखवतों.

[ उठूं लागतो. ]

**तारामती :** कृपा करून उठूं नका. तुमचं वाचनालय पाहाण्यासाठीं मीं पांचशें मैलांचा प्रवास केला नाहीं विश्राम. 'कर्नाटक इंडस्ट्रीज्'चा प्रश्न मला अधिक जिव्हाळ्याचा आहे.

**विश्राम :** त्या बाबतींत सांगतां येण्यासारखं मीं सांगितलं आहे. आत्तां सांगतां येण्यासारखं नाहीं तें परवां कायदेमंडळांत सांगणार आहें.

**तारामती :** [आर्जवीपणानें] विश्राम, कृपा करून कायदेमंडळांत तें भाषण करूं नका.

**विश्राम :** [स्तिमित होऊन] भाषण करूं नका ?

**तारामती :** तसं भाषण करूं नका ! विश्राम, तुम्हीं म्हणजे मुंबई सरकारनें ह्या कंपनीला आपला पाठिंबा देणं फार अगत्याचं आहे. तुमचा ह्या बाबतींतला एखादा अभिप्राय प्रसिद्ध झाला असला तरी आपलं मत बदलायचा, सुधारून घ्यायचा तुम्हांला अधिकार आहे. राजकारण म्हणजे सारी शब्दांची आरास आहे. ही कंपनी कर्नाटकच्या आर्थिक प्रगतीसाठीं फार महत्त्वाचं कार्य करणार आहे असं तुम्ही सहज जाहीर करूं शकतां. लोकांचा तुमच्यावर, तुमच्या शब्दावर विश्वास आहे. [आपलें सर्व आकर्षण पणाला लावून] माझ्यासाठीं तुम्ही ही गोष्ट करणार नाहीं का ?

**विश्राम :** तारामतीबाई, मला समजत नाहीं, तुम्ही गंभीरपणानें बोलतां आहांत कीं थट्टा करतां आहांत !

**तारामती :** दुर्दैवानें तुमची थट्टा करण्याचा मला अधिकार नाहीं. मी अगदीं गंभीरपणानें बोलतें आहें.

**विश्राम :** [कांहींशा कठोरतेनें] मग तुम्ही म्हणतां तसं कांहीं होणार नाहीं. हें माझं निश्चित उत्तर आहे.

**तारामती :** [आर्जवीपणाचा त्याग करून] ह्याहून वेगळं उत्तर द्याल तर त्यांत तुमचाही फायदा, खूप मोठा फायदा होऊं शकेल.

**विश्राम :** [आश्चर्यानें] माझा फायदा ?

**तारामती :** मी स्पष्टपणानें बोलतें. 'कर्नाटक इंडस्ट्रीज्'चं भवितव्य बरंचसं तुमच्या साहाय्यावर अवलंबून आहे. हें साहाय्य तुम्हीं अकारण द्यावं अशी अपेक्षा कुणी करीत नाहीं. कंपनीला पाठिंबा देण्याचं आश्वासन द्याल तर तुम्ही सांगाल ती रक्कम उद्यां सकाळीं तुमच्याकडे पोचती केली जाईल.

**विश्राम :** [उठून संतापानें] तुम्ही काय बोलतां आहांत...

**तारामती :** प्रत्येक माणसाला किंमत असते. तुमची, तुमच्या शब्दाची योग्य किंमत द्यायला मी तयार आहें.

**विश्राम :** ठीक आहे. ती मला घ्यावीशी वाटेल तेव्हां मी आपल्याला कळवीन. कृपा करून आपण आतां परत जा. आपण कुणाशीं बोलतों आहों ह्याची तुम्हांला जाणीव नाहीं !

[ बेल वाजविण्यासाठीं जाऊं लागतो. ]

**तारामती :** [ हातांतील पंख्यानें त्याच्या खांद्याला स्पर्श करीत ] मी कुणाशीं बोलतें आहें ह्याची फार चांगली जाणीव आहे मला. अंदाजपत्रकांतल्या गुप्त माहितीची विक्री करून ज्यानें आपल्या राजकीय जीवनाचा प्रारंभ केला...

**विश्राम :** [ ओरडतो ] तारामतीबाई !

**तारामती :** [ एकेक शब्द संथपणें व स्पष्टपणें उच्चारीत ] धवलगिरीसारखं पवित्र आणि निष्कलंक भासणारं तुमचं राजकारण कोणत्या काळ्याकुट्ट पापावर उभारलेलं आहे हें मला माहीत आहे. विश्राम, तुम्हीं सर विश्वनाथांना पाठवलेलं पत्रही, तुमच्या पापाचा बिनतोड पुरावा म्हणून मीं जवळ ठेवलं आहे !

**विश्राम :** शक्य नाहीं !

**तारामती :** त्याशिवाय का इतक्या अधिकारानें मीं तुम्हांला ही विनंती केली ? विश्राम, तुम्ही बुद्धिमान् आहांत, व्यवहारी आहांत. तुम्हीं माझ्या मागणीला संमति दिलीत, कायदेमंडळांत आमच्या कंपनीला पाठिंबा दिलात, तर तें पत्र मी तुमच्या स्वाधीन करीन.

**विश्राम :** तें कालत्रयींही होणार नाहीं.

**तारामती :** आपल्या पूर्वायुष्यांतील पाप कायमचं नष्ट करण्याची ही सुवर्णसंधि तुमच्या दाराशीं चालून आली आहे विश्राम. तिचा फायदा तुम्हीं घेतला पाहिजे. तुम्ही एका कड्याच्या कांठावर उभे आहांत हें लक्षांत ठेवा. विश्रामचा, त्यांच्या कीर्तीसह चुराडा करूं शकणारी विक्राळ दरी समोर पसरली आहे. तुम्हीं माझी सूचना अमान्य केली तर...

**विश्राम :** [ भयभीत होऊन ] तर...तर काय ?

**तारामती :** [ उठून आवेशानें बोलते. ] तर कायदेमंडळांत तुमचं भाषण होण्यापूर्वी, सकाळच्या प्रत्येक वृत्तपत्रांतून तुमचं हें पाप पुराव्यासह जगजाहीर होईल ! समाजाला आदर्श, श्रेष्ठ, सज्जन वाटणारे विश्राम कोणत्या किळसवाण्या चिखलांत पाय रोवून उभे आहेत हें जगाला समजून येईल. तुमचं राजकीय

जीवन पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें कोसळून पडेल, निःशेष होईल विश्राम, माझी सूचना तुम्हीं मान्य केली पाहिजे. माझ्याजवळ शस्त्र आहे, फार प्रभावशाली शस्त्र आहे. त्याचा प्रहार केल्याशिवाय मी राहाणार नाहीं. एका दुष्कृत्यानें तुम्हीं स्वतःचा उत्कर्ष साधलात, इतरांच्या उत्कर्षासाठीं तुम्हांला दुसरं दुष्कृत्य करायला कांहींच हरकत नाहीं.

**विश्राम :** [असहायपणें] तारामतीबाई, त्या पत्राची किंमत म्हणून मी तुम्हांला वाटेल तितका पैसा द्यायला तयार आहें.

**तारामती :** तुम्ही माझ्या म्हणण्याप्रमाणें वागायला तयार आहांत कीं नाहीं एवढाच माझा प्रश्न आहे. त्या पत्राची किंमत पैशानें होऊं शकत नाहीं.

**विश्राम :** मला विचार करायला सवड द्या. मी परवांचं भाषण तहकूब करतों.

**तारामती :** [अधिकारानें] तेंही शक्य नाहीं. भाषण झालं पाहिजे आणि तेंही मी सांगतें त्याप्रमाणें झालं पाहिजे. . . . [क्षणभर थांबते.] माझ्या म्हणण्यानुसार वागायचा तुमचा विचार दिसत नाहीं. जातें मी. वर्तमानपत्रांना पुरेसा वेळ मिळाला पाहिजे.

**विश्राम :** थांबा ! मी तुमचं म्हणणं मान्य करतों. कायदेमंडळांतील भाषणांत मी कंपनीला पाठिंबा देईन.

**तारामती :** [परत येऊन समाधानानें] मी आभारी आहें. भाषण होतांच तें पत्र मी तुमच्या हातांत ठेवीन.

[विश्राम जड पावलांनीं आंत जातो. बागेकडील दारांतून सौदामिनी प्रवेश करते.]

**सौदामिनी :** एकट्याच तुम्ही ? मला वाटलं विश्राम इकडे आहेत.

**तारामती :** आतांच गेले ते सौदामिनीबाई. मीही जातें आतां.

**सौदामिनी :** एक विचारूं का ?

**तारामती :** विचारा कीं.

**सौदामिनी :** विश्रामकडे तुमचं कांहीं तरी काम होतं असं दिसलं. काय होतं तें ?

**तारामती :** तुम्हांला सांगायला कांहींच हरकत नाहीं. 'कर्नाटक इंडस्ट्रीज्' ला त्यांनीं पाठिंबा द्यावा म्हणून प्रयत्न होता माझा.

**सौदामिनी :** हा प्रयत्न निष्फळ होणार हें तुम्हांला अगोदरच समजायला हवं होतं.

**तारामती :** [स्मित करीत] पण माझा प्रयत्न निष्फळ झाला नाहीं. फार थोड्या अवधींत मी त्यांना माझी बाजू पटवून देऊं शकलें. कंपनीला पाठिंबा द्यायला तयार आहेत ते.

**सौदामिनी :** तुमचा कांहीं तरी घोटाळा झालेला दिसतोय्!

**तारामती :** अद्याप तरी नाहीं. जातें मी सौदामिनीबाई. नमस्कार.

[तारामती बाहेर पडते. सौदामिनी तिच्याकडे दारांतून पाहात उभी राहाते. सदानंद येतो.]

**सदानंद :** ती बेळगांवची बाई गेली वाटतं?

**सौदामिनी :** आतांच गेली! ती मला ओळखत नाहीं, पण मी तिला ओळखतें.

**सदानंद :** म्हणूनच ती तुम्हांला ओळखत नसेल. ओळखीच्या माणसांना ओळखणं कित्येक वेळां फार कठीण जातं. काय म्हणणं आहे तिचं? नवं पातळ दाखवण्यासाठीं चार घरीं फिरणारी स्त्री नाहीं ती!

**सौदामिनी :** 'कर्नाटक इंडस्ट्रीज्' ला विश्रामचा पाठिंबा मिळवण्यासाठीं आली होती म्हणे!

**सदानंद :** बिचारी! त्यापेक्षां एखाद्या डोंगरापुढें भाषण करून तिनें त्याचा पाठिंबा कां नाहीं मागितला?

**सौदामिनी :** आपण जिंकलों असा तिचा समज आहे!

**सदानंद :** पराभव झाल्याचा तो निश्चित पुरावा आहे! बुद्धिमान् बायका सुद्धा किती निर्बुद्ध असतात!

**सौदामिनी :** अशा बायकांना मी बुद्धिमान् म्हणत नाहीं. मूर्ख असतात त्या.

**सदानंद :** एकच! अच्छा, गेलं पाहिजे आतां मला.

[आंतून विश्राम येतो.]

**विश्राम :** निघालास तूं सदानंद?

**सदानंद :** होय, जायलाच पाहिजे. आज बाबासाहेब मुंबईत आहेत. माझे कार्यक्रम मला तपासून पाहायला हवेत.

[सदानंद जातो. क्षणभर कोणीच बोलत नाहीं.]

**सौदामिनी :** [विनोदानें] कर्नाटकांतल्या त्या कंपनीला तुम्ही पाठिंबा देणार विश्राम? आतांच ऐकलं मीं!

**विश्राम :** कुणीं सांगितलं तुला ?

**सौदामिनी :** त्या तारामतीनें. विश्राम, तुम्हांला ती स्त्री ठाऊक नाहीं. ती माझ्या शाळेंत होती, माझ्या वर्गात होती. दुष्टपणावर, खोटेपणावर आणि कारस्थानावर ती निर्वाह करीत होती. चोरीच्या आरोपावरूनच तिला आमच्या शाळेंतून काढून टाकलं होतं. मला तिच्याबद्दल तिरस्कार वाटत होता आणि आजही वाटतो. अशा स्त्रीचा संपर्क सुद्धा तुम्हांला लागतां कामा नये विश्राम.

**विश्राम :** सौदामिनी, तूं म्हणतेस तें खरं असेल. परंतु मनुष्य सुधारूं शकत नाहीं का ? केव्हां तरी हातून घडलेल्या गोष्टींवरून माणसाची परीक्षा करूं नये.

**सौदामिनी :** माणसाची परीक्षा करण्याचा तोच एक शक्य आणि बिनचूक मार्ग असतो. मनुष्याचा भूतकाळ म्हणजेच मनुष्याचं चारित्र्य.

**विश्राम :** फार कठोरपणाचं विधान आहे हें.

**सौदामिनी :** कठोरपणाचं असलं तरी खरं आहे. तारामतीला खोटं बोलायची सवय आहे. मला तिनें सांगितलं तेंही खोटंच आहे ना ?

**विश्राम :** त्या कंपनीसंबंधीं माझं मत चुकीचं होतं सौदामिनी !

**सौदामिनी :** [आश्चर्यचकित होऊन] चुकीचं होतं ? पण तुम्हीं आजच, तारामती येण्यापूर्वी मला सांगितलंत, कीं ती कंपनी म्हणजे एका सोनेरी टोळीचं कारस्थान आहे !

**विश्राम :** होय ... पण माझं मत मीं आतां बदललं आहे.

**सौदामिनी :** बदललं आहे ?

**विश्राम :** होय.

**सौदामिनी :** विश्राम, तुमचीं मतं अशीं एका घटकेंत बदलूं शकतात ?

**विश्राम :** सौदामिनी, कांहीं राजकीय कारणासाठीं मला माझं मत बदलावं लागलं. राजकारण हा एक व्यवहार आहे आणि व्यवहारांत तडजोड केल्याशिवाय चालत नाहीं !

**सौदामिनी :** [कांहीं बोध होत नसल्याप्रमाणें] कसली तडजोड ? कुणाशीं तडजोड ?

**विश्राम :** आपली तत्त्वनिष्ठा आणि परिस्थिति ह्यांच्यांतील तडजोड.

**सौदामिनी :** [ संयमित रागानें ] तत्त्वाच्या बाबतींत तडजोडीला अवसरच नाहीं विश्राम. आणि तुमचंही मत आज संध्याकाळपर्यंत ह्याहून वेगळं नव्हतं ! किती वेगळी आणि विसंगत भाषा बोलतां आहांत तुम्ही ! एखाद्या किराण्या दुकानदाराला शोभण्यासारखं हें तडजोडीचं तत्त्वज्ञान, विश्राम, तुमचं नाहीं, खास तुमचं नाहीं ! एका घटकेमध्यें इतके बदलून गेलांत विश्राम ?

**विश्राम :** [ हताशपणानें ] मी बदललों नाहीं. परिस्थितीमुळें कांहीं निर्णय बदलणं मला आवश्यक वाटतं.

**सौदामिनी :** [ संयम सुटतो. ] कोणतीही अयोग्य गोष्ट आवश्यक असूं शकत नाहीं ! आणि हें कशासाठीं विश्राम ?... पैसा ? पैशाची आपल्याला जरुरी नाहीं आणि असती तरी अशा मार्गानें पैसा मिळवणं हें पापच ठरलं असतं. विश्राम, तुमच्या हातीं सत्ता आहे, तुमच्यावर लोकांचा विश्वास आहे. त्या सत्तेचा, त्या विश्वासाचा असा दुरुपयोग करूं नका. तुम्ही व्यासपीठावर उभे राहातांच लोक भक्तिभावानें तुमचा जयजयकार करतात; त्या भोळ्या भक्तिभावाची अशी वंचना करूं नका.

**विश्राम :** सौदामिनी, साध्या गोष्टीला किती भयंकर स्वरूप देतेस तूं ! एका क्षुल्लक प्रश्नाबाबत, कांहीं आवश्यक गोष्टीसाठीं थोडी तडजोड करावी लागली म्हणून काय हरकत आहे ?

**सौदामिनी :** इतरांच्या बाबतींत नाहीं. तुमच्या बाबतींत जरूर आहे. सर्व समाज आदर्श नेता म्हणून तुमच्याकडे पाहात आहे. तुमच्या प्रामाणिकपणावर, नेकीवर विश्वास ठेवून लोकांनीं तुम्हांला मंत्रिपदाचा मान आणि अधिकार दिला. तुमचं राजकारण, तुमचं जीवन इतरांप्रमाणें हीन नाहीं. कां असा विचार आजच तुमच्या मनांत आला ? ... विश्राम, मला ठाऊक आहे, पूर्वी केव्हां तरी हातून घडलेल्या एखाद्या दुष्कृत्याबद्दल माणसाला जबरदस्त किंमत द्यावी लागते. एका पापाच्या क्षालनासाठीं दुसरं पाप करावं लागतं. विश्राम, [ त्याच्याकडे रोखून पाहाते. ] तसं कांहीं तुम्हीं केलं आहे ?

**विश्राम :** [ हें सारं असह्य होऊन ] सौदामिनी !

**सौदामिनी :** असं कांहीं दुष्कृत्य तुमच्या हातून घडलं आहे ? घडलं असलं तर...

**विश्राम :** तर...तर काय ?

**सौदामिनी :** [ निर्दय संथपणानें ] तर आपल्या जीवनाचे मार्ग ह्याच क्षणाला वेगळे होऊं द्यात ! [ तिच्या डोळ्यांत आसवें चमकतात. ]

**विश्राम :** [ निर्धारानें ] सौदामिनी, तुझ्यापासून लपवावं असं माझ्या जीवनांत कांहींही नाहीं.

**सौदामिनी :** [ हर्षानें ] नाहीं ना ? माझी खात्री होती, माझ्या देव्हाऱ्यांतले देव खोटे नाहींत. मग माझी परीक्षा पाहाण्याकरितां असं कांहीं तरी बोलत होतां ? तें जाऊं द्या. तुम्हीं तारामतीला कांहीं वचन दिलं असेल तर आतांच्या आतां तिला पत्र पाठवून, मी असं कांहींही करूं शकणार नाहीं हें तिला कळवा.

**विश्राम :** त्यापेक्षां उद्यां तिला प्रत्यक्ष भेटून सांगणं अधिक बरं नाहीं का ?

**सौदामिनी :** विश्राम, तुम्हीं तारामतीला पुन्हा भेटतां कामा नये. तुमच्या-सारख्या माणसाबरोबर उभं राहाण्याचीही तिची योग्यता नाहीं. आत्तांच तिच्या पत्त्यावर सरदारगृहांत पत्र पाठवायला हवं. लिहा आत्तांच पत्र.

[ कोपऱ्यांतील टेबलावरून लिहिण्याचें साहित्य त्याच्याजवळ आणून देते. ]

**विश्राम :** पण...

**सौदामिनी :** तिला ताबडतोब कळायला हवं विश्राम. दुर्गुणांनीं सद्गुणांवर, चारित्र्यहीनतेनें चारित्र्यावर, स्वार्थानें सेवावृत्तिवर विजय मिळवला हें समाधान तिला फार वेळ लाभतां कामा नये. [ विश्राम पत्र लिहूं लागतो. ] तुमची अप्रामाणिक सूचना मी मान्य करीत नाहीं म्हणून साफ कळवा तिला. [ पत्र घेते आणि वाचते. ] महादेव, [ बेल वाजवते. महादेव येतो. ] महादेव, हें पत्र ताबडतोब सरदारगृहांत पाठवायला सांग. उत्तर वगैरे आणायचं नाहीं.

[ महादेव पत्र घेऊन जातो. ]

**सौदामिनी :** [ विश्रामच्या पायांजवळ बसून त्याचे हात हातांत घेते. ] विश्राम, किती समाधान वाटतं मला ! आम्हां स्त्रियांना फारसं कांहीं करतां येत नाहीं. पण आमच्या देवाचं देवपण आम्ही कायम ठेवूं शकलों, सुरक्षित राखूं शकलों तरीही आमचं जीवन सफल होतं. विश्राम, तुम्हांला स्वतःच्या योग्यतेची, थोरपणाची जाणीव नाहीं. तुमच्यामुळें माझ्याच नव्हे तर महाराष्ट्राच्या राजकीय जीवनामध्यें एक विलक्षण पावित्र्य, एक अलौकिक उदात्तता निर्माण झाली आहे. आणि म्हणूनच विश्राम, मी तुमच्यावर श्रद्धेनें प्रेम करीत आलें आहें.

**विश्राम :** सौदामिनी, तुझ्या प्रेमाची मला फार जरूर आहे, तुला कल्पना नाहीं इतकी जरूर आहे. [तिला उठवून जवळ घेतो.] जीवनाच्या कुठल्याही चांगल्यावाईट काळांत तुझ्या प्रेमाची ही संजीवनी मला लाभली तरच...

**सौदामिनी :** असं बोलूं नका ना! मी कांहीं सनातनी नाहीं. पण जन्मोजन्मीं मला तुमचा लाभ व्हावा म्हणून रोज प्रार्थना करतें मी. जाऊं मी आतां?

**विश्राम :** जा.

[सौदामिनी आंत जाते. विश्राम कांहीं क्षण दिवाणखान्यांत फिरतो, कोचावर बसतो आणि नंतर तोंड दोन्ही हातांनीं झाकून घेऊन 'महादेव' म्हणून ओरडतो. महादेव येतो.]

**विश्राम :** महादेव, घालवून टाक हे सारे दिवे!

[महादेव दिवे मालवतो व जातो. दिवाणखान्यांत अंधार होतो. पलीकडच्या दालनांतील कांहीं प्रकाशकिरण मात्र दिसत असतात.]

# ८

## प्रवेश पहिला

[विश्रामच्या घरांतील बाहेरचें दालन. वेळ: दुसऱ्या दिवसाची सकाळ. रावबहादुर आले आहेत परंतु जाण्याच्या तयारींत आहेत. जातांना पुष्पाशीं दोन शब्द बोलल्यावांचून त्यांना राहावत नाहीं.]

**रावबहादुर :** विश्राम एकटा नाहीं म्हणतेस?

**पुष्पा :** नाहीं, सदानंद आले आहेत. कांहीं तरी महत्त्वाचीं बोलणीं चाललीं आहेत त्यांचीं.

**रावबहादुर :** आमच्या चिरंजिवांबरोबर महत्त्वाचीं बोलणीं! बैलाबरोबर बीजगणिताची चर्चा करण्यासारखंच आहे हें! नव्या नाटकांचे प्रयोग, व्यायामशाळांचे समारंभ आणि क्लबांतल्या पत्त्यांच्या बैठकी एवढ्याच गोष्टी त्यांच्या हिशेबीं महत्त्वाच्या आहेत. मनुष्य म्हणजे पत्ते खेळणारा प्राणी अशी व्याख्या आहे त्यांची. विश्रामला म्हणावं, त्यांच्या नादीं लागण्यापेक्षां उद्यांच्या भाषणाची तयारी तरी करीत बैस.

**पुष्पा :** बाबासाहेब, सदानंदांचे दुर्गुण तुम्हांला दिसतात, सद्गुण मात्र दिसत नाहींत!

**रावबहादुर :** नसलेली गोष्ट दिसायला मनुष्य महात्मा तरी असावा लागतो नाहीं तर वेडा तरी असावा लागतो. सुदैवानें मी दोन्ही नाहीं!

**पुष्पा :** मी मात्र सुदैवानें वेडी आहें...

**रावबहादुर :** तरुण माणसं वेडींच असायला हवींत. आम्ही तरुणपणीं साक्षात् वेडेच होतों. राजकारणाचं वेड, सभांचं वेड, ग्रंथांचं वेड, पुढाऱ्यांचं वेड... आमच्या ह्या पगडीखालीं साऱ्या वेडांचा बाजार होता! वासुदेवरावजींनीं 'वेडे व्हा' म्हणून सांगितलं तें खोटं नाहीं. पण आमचे चिरंजीव शहाणे आहेत, फार शहाणे आहेत, हीच माझी तक्रार आहे!

**पुष्पा :** [रागाच्या आविर्भावानें] काय केलं हो त्यांनीं?

**रावबहादुर :** काय केलं? त्यांनीं कांहींही केलं असतं तरी मला आनंद वाटला असता. पण अति शहाण्याचा बैल रिकामा. माणसं म्हातारपणीं शहाणीं होतात आणि निष्क्रियही होतात तीं उगाच नाहीं. हीं शहाणीं माणसं आपल्या शेतांत शब्द पिकवतात आणि शब्दांचाच व्यापार करतात. करणं हें क्रियापदच त्यांच्या कोशांत नसतं. आमचे चिरंजीव सारं कांहीं बोलतात पण करीत मात्र कांहींच नाहींत. लग्नासारखी किरकोळ गोष्ट सुद्धा त्यांच्या हातून झाली नाहीं आजवर!

**पुष्पा :** किरकोळ गोष्ट! शिखरावर गेलेल्या माणसाला डोंगर चढणं ही गोष्ट फार सोपी वाटावी ह्यांत नवल नाहीं. पायथ्याशीं उभं राहाणाऱ्यांची भावना वेगळी असते.

**रावबहादुर :** पायथ्याशीं विचार करीत उभं राहिल्यावर चढून जाण्याचा धीर कधींच होणार नाहीं. लग्नांत कसला आला आहे विचार?

**पुष्पा :** अविचारानें लग्न केलं म्हणजे जन्मभर पश्चात्ताप करण्याची सोय झाली!

**रावबहादुर :** हें बायकांच्या बाबतींत कदाचित् खरं असेल. कारण बायका करून करून शेवटीं करणार काय, फार तर लग्न! लग्न म्हणजे स्त्रियांचं सर्वस्व असतं, पण पुरुषांच्या दृष्टीनें लग्न म्हणजे केवळ एक सोय अथवा गैरसोय टाळण्याचा सोपा मार्ग आहे. ज्यांच्या कर्तबगारीला घराबाहेर अवसर नाहीं त्यांनाच लग्नाबद्दल पश्चात्ताप करायला सवड मिळते. इतरांना लग्न केल्यावर लग्नाची आठवणही उरत नाहीं. माझ्या डोक्यावर पगडी आहे म्हणून माझ्या डोक्यांत सुद्धा काय पगडीबद्दलच विचार आहेत का? आजकालचे लोक ह्या लग्नासारख्या साध्या गोष्टीला कांहीं तरी अक्राळविक्राळ स्वरूप देतात आणि नंतर ती भयप्रद झाली म्हणून छाती पिटीत बसतात! आमच्या चिरंजिवांना नेहमीं हेंच सांगतों मी, लग्न ही गोष्ट चर्चा करण्याची नाहीं, करण्याची आहे!

**पुष्पा :** मग काय म्हणताहेत ते ?

**रावबहादुर :** ते काय म्हणतात हें त्यांच्या बापालाही समजणार नाहीं, समजलेलं नाहीं !

**पुष्पा :** मी सांगूं ? सध्या मुलीचा शोध करताहेत ते.

**रावबहादुर :** मुलीचा शोध म्हणजे काय अमेरिकेचा शोध लावायचा आहे ? सध्याच्या काळांत चार तासांत छप्पन मुली आंगाला धक्के मारून जातात ! त्यांतल्या पंचावन मुलींना नाहीं म्हटलं म्हणजे आपोआप एकीचा शोध लागतो. परंतु आजचे तरुण कुणालाच नाहीं म्हणत नाहींत ! दिसेल त्या मुलीला अंतःकरणाच्या धर्मशाळेंत जागा देतात. शेवटीं धर्मशाळेचा मीनाबाजार होतो आणि लग्न ही गोष्ट अशक्य होते ! आज मी चिरंजिवांना निक्षून सांगणार आहें, चोवीस तासांत तुम्ही लग्न करा, नाहीं तर मी करतों !

**पुष्पा :** तुम्ही करणार ?

**रावबहादुर :** मी करणार म्हणजे ठरवणार ! आणि विश्रामला सांग, सदानंदा-बरोबर उगाच हवापाण्याच्या गोष्टी करीत बसूं नकोस, उद्यांच्या भाषणाची तयारी कर. अनेकांचे कान ह्या भाषणाकडे लागले आहेत म्हणावं. इतर साऱ्या गोष्टी ह्यापुढं वर्ज्य. मी जातों आतां. आमच्या पार्टीच्या कार्यकारी मंडळाशीं पंतप्रधानांचे कांहीं तीव्र मतभेद झाल्याची गुप्त बातमी मला कळली आहे आतांच. मी आतां तिकडेच निघालोंय्. जाऊन येतों.

**पुष्पा :** असं जाऊं देणार नाहीं. चला, जातांना वहिनींना भेटून जा.

[ दोघेंही जातात. ]

## प्रवेश दुसरा

[ त्याच घरांतील एक प्रशस्त खोली. सदानंद सचिंत होण्याचा प्रयत्न करीत एका मेजाला टेकून उभा आहे. विश्राम अस्वस्थ होऊन खुर्चीवर बसलेला आहे. ]

**सदानंद :** विश्राम, ही सारीच गोष्ट फार विलक्षण आहे. माझं मत विचारशील तर हें सारं प्रकरण तूं तुझ्या बायकोला सांगायला हवं होतंस. माणसानें आपल्या बायकोपासून कांहींही लपवून ठेवूं नये, कारण केव्हां तरी तें तिला कळल्याशिवाय

राहात नाहीं. बायकांची नजर ही एक चमत्कारिक चीज आहे. दडवलेल्या गोष्टी कधीं तिच्यापासून दडून राहात नाहींत आणि उघड असलेल्या गोष्टी तिला कधीं दिसून येत नाहींत. म्हणून बायकांपासून एखादी गोष्ट लपवायची असेल तर ती त्यांच्यासमोर उघडच केली पाहिजे !

**विश्राम :** सौदामिनीला हें सांगणं शक्य नव्हतं सदानंद. आणि कधीं सांगणार? काल रात्रीं? माझ्या जीवनांतील ती शेवटची सुखाची रात्र ठरली असती. नाहीं. तें शक्य नव्हतं! एखाद्या अमंगल पिशाचापासून दूर व्हावं त्याप्रमाणें ती माझ्यापासून दूर झाली असती, मला कायमची दुरावली असती.

**सदानंद :** तुझी सौभाग्यवती काय एखादी अतिमानवी देवता आहे?

**विश्राम :** होय. सद्गुण आणि सद्गुणावरील श्रद्धा हीं जर अतिमानवी आणि दैवी असतील तर ती अतिमानवी देवताच आहे.

**सदानंद :** मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे! [सावरून] माफ कर विश्राम, मला तसं कांहीं म्हणायचं नाहीं. पण तूं म्हणतोस तें खरं असेल, तर तुमच्या जीवनाचं तत्त्वज्ञान काय, हा सुप्रसिद्ध प्रश्न मला सौदामिनीताईना एकदा विचारला पाहिजे आणि जीवनाचं खरं तत्त्वज्ञानही त्यांना समजावून सांगितलं पाहिजे. पण ही गोष्ट त्यांना तूं पूर्वीच कां नाहीं सांगितलीस?

**विश्राम :** लग्नापूर्वी? मग तिनें माझ्याशीं लग्नच केलं नसतं. सौदामिनीच्या प्रेमावांचून, सहवासावांचून माझं जीवन अशक्य होतं सदानंद. माझ्या मोठेपणाचा उगम इतका हीन आहे हें तिला समजलं असतं तर माझ्या गळयांत घालण्यासाठीं उचललेला हार तिनें पायांखालीं तुडवला असता आणि त्याबरोबर माझ्या जीवनांतलीं सारीं सुंदर स्वप्नंही चिरडलीं गेलीं असतीं. इतकं धैर्य मला झालं नाहीं.

**सदानंद :** [संथपणें] होय, सौदामिनीच्या आणि लोकांच्या दृष्टीनें तुझ्या मोठेपणाचा उगम हीन आहे ह्यांत शंका नाहीं.

**विश्राम :** [चिडून] लोकांच्या दृष्टीनें! ज्यांच्या प्रत्येक पावलाखालीं संसारांतील सद्भावनांचा, सत्याचा आणि पवित्रतेचा संहार होत आहे त्या लोकांच्या दृष्टीनें! घटकेच्या स्वार्थासाठीं कुठल्याही माणसाचा आणि कुठल्याही तत्त्वाचा गळा चिरायला ज्यांनीं क्षणमात्र संकोच केला नसेल अशा लोकांच्या दृष्टीनें!

**सदानंद :** लोक असे असतात म्हणूनच इतरांच्या दोषांवर चंचुप्रहार करणं त्यांना जरूर वाटतं. समाजांतील निंदक हे कावळ्यांप्रमाणें स्वतः अमंगल असतात आणि म्हणून जगांतील अमंगलावरच त्यांचा चरितार्थ चाललेला असतो.

**विश्राम :** आणि ह्या गोष्टीमुळें मीं कुणाचं नुकसान केलं आहे का ? कुणाच्या हिताची पायमल्ली केली आहे का ? कुणाच्या जीवनाला जखम केली आहे का ?

**सदानंद :** फक्त स्वतःच्याच जीवनाला जखम केली आहेस तूं !

**विश्राम :** [क्षणभर थांबून] अर्थात् ही गोष्ट खरी आहे, कीं कांहीं सरकारी माहितीचा मला सुगावा लागला आणि तिचा मीं स्वतःसाठीं उपयोग केला. परंतु आजच्या जगांत वैभवाची प्रत्येक मजलेदार इमारत एखाद्या रहस्याच्या पायावरच उभारलेली असते.

**सदानंद :** पायांत चिणलेल्या त्या रहस्याचं पिशाच्च शेवटीं त्या मजलेदार इमारतीच्या छपरावर उभं राहून ओरडूं लागतं इतकंच !

**विश्राम :** [उठून फिरूं लागतो.] सदानंद, दहा बारा वर्षांपूर्वी, तारुण्याच्या नव्हाळींत हातून घडलेल्या एखाद्या कृत्यानें माझं सारं आयुष्य कलंकित होऊं शकतं का ? दरोडे घालणाऱ्या गुन्हेगारांच्या तुरुंगवासाला सुद्धा मर्यादा असते. माझ्या हातून घडलेला गुन्हा, जर त्याला गुन्हा म्हणतां येत असेल तर, इतका भयंकर आहे का, कीं त्यासाठीं माझं सारं जीवन जमीनदोस्त व्हावं ? शुद्ध अन्याय नाहीं का हा ?

**सदानंद :** न्याय ही गोष्ट फक्त अन्याय ह्या शब्दांत आणि तीही अभावानेंच शिल्लक राहिली आहे. न्यायाची अपेक्षा कुणीं करूं नये.

**विश्राम :** प्रत्येक युगाचीं विशिष्ट शस्त्रं असतात आणि महत्त्वाकांक्षी माणसाला त्या शस्त्रांनींच त्या युगाशीं लढावं लागतं. संपत्ति हें आजच्या युगाचं शस्त्र आहे. संपत्तीच्या आधाराशिवाय ह्या युगांत कुणी यशस्वी होऊं शकणार नाहीं, मीही झालों नसतों.

**सदानंद :** विश्राम, तूं आतां स्वतःलाच अन्याय करीत आहेस. माझी खात्री आहे, केवळ आपल्या कर्तबगारीनेंही तूं यशस्वी झाला असतास.

**विश्राम :** होय, कदाचित् झालोंही असतों...पण म्हातारपणीं ! यशस्वी होण्याची इच्छा नाहींशी झाल्यावर ! मनगटांतील सामर्थ्य क्षीण झाल्यावर,

अंतःकरणांतील महत्त्वाकांक्षा मरून गेल्यावर ! सदानंद, प्रेताच्या छातीवर पडणाऱ्या फुलांच्या राशीनें त्याचा कधीं गौरव होतो का ? यौवनांत यश मिळालं तरच त्याची मातब्बरी वाटते. मला यश मिळवायचं होतं आणि वृद्धापकाळानें मान नम्र होण्यापूर्वी मिळवायचं होतं !

**सदानंद :** तुझी आकांक्षा पुरी झाली आहे ह्यांत शंका नाहीं. चाळिशी उलटायच्या आंतच तूं मुंबईचा लोकप्रिय नेता झालास, कायदेमंडळांत निवडून आलास आणि मंत्रिपदासारख्या जबाबदारीच्या जागेवर तुझी योजना झाली.

**विश्राम :** आणि दहा वर्षापूर्वी केलेल्या एका गोष्टीसाठीं हें सारं माझ्यापासून हिरावून घेतलं जावं ? एका क्षुल्लक अपराधासाठीं मीं सामाजिक आणि राजकीय जीवनांतून हद्दपार व्हावं ?

**सदानंद :** कसं तूं पैशासाठीं स्वतःला विकून घेतलंस ?

**विश्राम :** [आवेशानें] मीं पैशासाठीं स्वतःला विकून घेतलं नाहीं सदानंद. मीं यश विकत घेतलं आणि तेंही फार मोठी किंमत देऊन.

**सदानंद :** होय, फार मोठी किंमत देऊन ! पण ही वाट तुला दाखवली कुणीं ?

**विश्राम :** सर विश्वनाथ डोंगरे.

**सदानंद :** सर विश्वनाथ डोंगरे ! मेलेल्या माणसाबद्दल वाईट बोलूं नये. पण कांहीं माणसं मेलीं तरी त्यांच्याबद्दल चांगलं बोलतां येणं शक्य नसतं. पट्टीचा बदमाष !

**विश्राम :** असं म्हणूं नकोस. त्यांच्या काळांतील ते श्रेष्ठ राजकारणी पुरुष होते. व्यासंग, दूरदृष्टि, प्रखर बुद्धिमत्ता आणि सफाईदार वक्तृत्व ह्यांचा दुर्मिळ संगम झालेला होता त्यांच्या ठिकाणीं. त्यांच्याइतका बुद्धिमान् माणूस माझ्या क्वचितच पाहाण्यांत आला आहे.

**सदानंद :** बुद्धिमान् बदमाषापेक्षां सज्जन मूर्ख मला अधिक प्रिय वाटतो. मूर्ख माणसं, लोक समजतात त्याहून पुष्कळच जास्त आदराला पात्र असतात. मूर्ख लोकांनीं जगाचा फायदा केला नसेल इतकंच, परंतु बुद्धिमान् लोकांनीं जगाचं नुकसान केलं आहे ! कदाचित् हें स्वतःचंच कौतुक होत असेल परंतु बुद्धिमंतांपेक्षां मूर्खांचीच समाजाला अधिक आवश्यकता आहे. पण सर विश्वनाथांच्या जाळ्यांत तूं कसा सापडलास ?

**विश्राम** : [आरामखुर्चीत बसून] मी त्या वेळीं आय्. सी. एस्. होऊन मुंबईला सेक्रेटेरियटमध्यें कामाला होतों. लोकांच्या दृष्टीनें श्रीमंती, सत्ता आणि सुख ह्या तिन्हींचा मला लाभ झाला होता; परंतु ह्या तिन्ही गोष्टी माझ्यापासून फार दूर होत्या. हजार रुपयांचा तनखा खिशांत पडत होता; परंतु आय्. सी. एस्.-साठीं झालेलं हजारों रुपयांचं कर्ज माझ्या माथ्यावर होतं. सत्ता मिळाली होती पण कचेरीच्या चार भिंतींपलीकडे त्या सत्तेला अवसर नव्हता. त्या लहानशा सोनेरी पिंजऱ्यांत माझ्या तरुण, महत्त्वाकांक्षी मनाला समाधान वाटेना, सुख मिळेना. सर्व समाजाच्या अंतःकरणावर स्वामित्व गाजवण्याचं, लोकांचा नेता होण्याचं स्वप्न मी लहानपणापासून पाहात होतों. लोकनेता होण्याऐवजीं वरिष्ठ दर्जाची मजुरी करणारा एक गुलाम मात्र झालों मी! शृंखला तोडावी असं वाटत होतं परंतु नंतरच्या स्वप्नपूर्तीसाठीं जरूर असलेलं साधन माझ्याजवळ नव्हतं. ह्याच काळांत सर विश्वनाथांची आणि माझी भेट झाली. तो प्रसंग मी कधीं विसरणार नाहीं. [एखादें स्वप्न पाहात असल्याप्रमाणें] सर साहेबांची वृद्ध परंतु तेजस्वी मूर्ति मध्यभागीं एका कोचावर बसली होती आणि आम्ही तरुण मंडळी सभोवार बसून आदरानें आणि कुतूहलानें त्यांचं प्रभावी वक्तृत्व ऐकत होतों.... पाईपमधून बाहेर पडणारीं धुराचीं वलयं त्यांच्या मस्तकाभोवतीं एखाद्या प्रभावळीप्रमाणें तरंगत होतीं आणि त्यांचा प्रत्येक शब्द पहाटे ऐकूं येणाऱ्या घंटानादाप्रमाणें स्पष्ट, अर्थपूर्ण आणि गंभीर वाटत होता.... सत्ता आणि सुवर्ण ह्यांच्या पूजनाचं, निर्दय एकनिष्ठ पूजनाचं तत्त्वज्ञान ते आम्हांला समजावून सांगत होते. आपल्या शब्दांचं सामर्थ्य अजमावण्यासाठीं त्यांची तीक्ष्ण दृष्टि प्रत्येकाच्या डोळ्याचा वेध घेत होती.... त्यानंतर कांहीं दिवसांनीं मलबारहिलवरील आपल्या निवासांत त्यांनीं मला बोलावून घेतलं. कुबेराला शोभण्यासारखं आपलं सर्व ऐश्वर्य त्यांनीं मला दाखवलं आणि सांगितलं, हें ऐश्वर्य म्हणजे रंगभूमीवर मांडलेला केवळ एक देखावा आहे. जीवनांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे सत्ता, अधिकार आणि ही गोष्ट केवळ श्रीमंतांनाच साध्य आहे. श्रीमंतांना विकत घेतां येत नाहीं अशी कोणतीही गोष्ट नाहीं!

**सदानंद** : अगदीं उथळ आणि अधम तत्त्वज्ञान!

**विश्राम** : मला तेव्हां तसं वाटलं नाहीं... आणि आजही वाटत नाहीं. पैशामुळेंच मला सत्ता मिळाली आहे, ह्या अधिकारापर्यंत मी पोचूं शकलों आहें. त्यामुळेंच मला स्वातंत्र्य मिळालं, नोकरीची शृंखला मला तोडतां आली. सदानंद,

तूं कधींच गरीब नव्हतास आणि महत्त्वाकांक्षीही नव्हतास. सर विश्वनाथांनीं जी संधि मला दिली तिचं महत्त्व तुला कधीं समजणार नाहीं.

**सदानंद :** कोणती संधि दिली ?

**विश्राम :** मी जायला निघालों तेव्हां त्यांनीं मला एक सूचना केली. मीं त्यांना कांहीं विशिष्ट महत्त्वाची माहिती पुरवली तर... तर ते मला श्रीमंत करणार होते. तीन आठवड्यांनंतर सरकारी अंदाजपत्रकाचे कागद माझ्या हातीं आले.

**सदानंद :** [जमिनीवर दृष्टि खिळवून] अंदाजपत्रकाचे कागद ?

**विश्राम :** होय.

**सदानंद :** [एकदम दृष्टि वरती उचलून] विश्राम, अशा मोहाला बळी पडण्याइतका तूं दुर्बळ असशील असं वाटलं नव्हतं मला.

**विश्राम :** [उठून तिरस्कारानें] मोहाला बळी पडण्याइतका दुर्बळ ! प्राथमिक पुस्तकांतल्या ह्या शब्दप्रयोगावर तुझी अजूनही निष्ठा आहे ! मोहाला बळी पडण्याइतका दुर्बळ ! किती मूर्खपणाची कल्पना ! ज्या भेकडांच्या जीवनांत कधीं मोह आले नाहींत आणि मोहाच्या समोर उभं राहाण्याचा धीर ज्यांना झाला नाहीं त्यांनीं स्वतःचं केलेलं समर्थन आहे हें. सदानंद, मोहाला बळी पडण्यासाठीं फार मोठं सामर्थ्य लागतं, फार मोठं धैर्य लागतं. एका क्षणासाठीं पूर्वीची सारी कमाई, सारी कीर्ति, सारं भवितव्य पणाला लावावं लागतं. एका मोहाकरितां — मग तो सत्तेचा असो वा सुखाचा असो — स्वतःचं सारं जीवन जाळून टाकण्याची सिद्धता ठेवावी लागते. नाहीं, मोहाला बळी पडण्यांत दुर्बलता नाहीं. त्यासाठीं विलक्षण धैर्य लागतं. तें धैर्य माझ्याजवळ होतं. सर विश्वनाथांना हवी असलेली माहिती मीं त्यांना पुरवली. त्या माहितीच्या अनुरोधानें केलेल्या व्यवहारांत त्यांना कित्येक लाखांचा फायदा झाला.

**सदानंद :** आणि तुला ?

**विश्राम :** मला त्यांनीं दोन लाख रुपये दिले.

**सदानंद :** तुझ्या त्यागाची किंमत ह्याहून अधिक व्हायला हवी होती.

**विश्राम :** नाहीं, मला ते पुरेसे होते. ह्या पैशानें मला स्वातंत्र्य मिळवून दिलं. मीं ताबडतोब नोकरी सोडली आणि राजकारणांत पडलों. सरसाहेबांच्या सल्ल्याप्रमाणें मी माझे पैशाचे व्यवहार करीत होतों. दोन तीन वर्षांत मी लक्षाधीश

झालों. नंतर ... नंतरचं तुला सारं माहीत आहे. माझं नशीब शिकंदर ठरलं. इतकं कीं हा आपल्याला शाप आहे कीं काय अशी विचित्र भीति मला कधीं कधीं वाटूं लागे. मी हात लावीन त्या वस्तूचं सोनं होई, मी पाय टाकीन तिथं माझा गौरव होई.

**सदानंद** : ह्या गोष्टीचा तुला कधीं पश्चात्ताप झाला नाहीं ?

**विश्राम** : कधींही नाहीं. मला लढायचं होतं. समाजानं मान्य केलेलं हत्यारच मीं उचललं आणि अखेर विजयी झालों.

**सदानंद** : [उद्वेगानें] होय, विजयी झालास, निदान तुला वाटलं, आपण विजयी झालों.

**विश्राम** : होय, मला असं वाटलं. [क्षणभर थांबून व एका खुर्चीवर बसून] सदानंद, ही हकिगत ऐकून तुला माझ्याबद्दल तिरस्कार वाटूं लागला आहे का ?

**सदानंद** : [किंचित् भावनावश होऊन] मला तुझ्याबद्दल फार वाईट वाटतं विश्राम, फार वाईट वाटतं.

**विश्राम** : मला पश्चात्ताप वाटला नाहीं, निदान नेहमींच्या निर्बुद्ध अर्थानें वाटला नाहीं. परंतु ह्या अपराधाची भरपाई मीं केली. त्या एका प्रसंगानंतर, देशासाठीं कुठलाही त्याग करायला, कुठलेंही संकट सहन करायला मीं मागें पुढें पाहिलं नाहीं कीं कुठल्याही थोर तत्त्वापासून आणि निष्ठेपासून मी रेसभर बाजूला ढळलों नाहीं. सरसाहेबांपासून जितके पैसे मीं घेतले त्याहून कितीतरी अधिक पैसे मीं वेगवेगळ्या सामाजिक संस्थांना देणग्या म्हणून दिले आहेत.

**सदानंद** : सामाजिक संस्थांना देणग्या ! समाजाचं किती नुकसान केलंस तूं ! ... ठीक आहे. ह्या प्रकरणांत मी तुला करतां येईल ती मदत करायला सिद्ध आहें. तुला हें सांगण्याची जरुरी आहे असं नाहीं.

**विश्राम** : सदानंद, मी तुझा आभारी आहें. शब्द औपचारिक असले तरी अर्थ औपचारिक नाहीं. मला तुझी फार जरूर आहे. पण काय करतां येईल आपल्याला ?

**सदानंद** : काय करतां येईल ? [खुर्चीवर मागें मान टाकून बसतो.] चुका कबूल करणारे पुढारी समाजाला आवडतात. तो जितक्या जास्त चुका कबूल करील तितकी त्याच्या लोकप्रियतेंत अधिक भर पडते...पण तुझ्या बाबतींत असा कबुलीजबाब देऊन चालणार नाहीं. हें प्रकरण जरा चमत्कारिक आहे. लोक

स्वभावतः इतके अनीतिमान् असतात कीं आपल्या नेत्यांनीं व्यासपीठावरून नीतिमत्तेचा जयघोष केलेला ऐकल्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं आणि तूं हा कबुलीजबाब दिलास तर असा जयघोष करण्याचा अधिकार तुला राहाणार नाहीं. तुला व्यासपीठावरून उतरावं लागेल, सामाजिक जीवनांतून बाहेर पडावं लागेल.

**विश्राम** : [सावेश] नाहीं, त्यापूर्वीं माझं सर्व बळ पणाला लावून मी लढल्याशिवाय राहाणार नाहीं.

**सदानंद** : ही एकच गोष्ट करणं शक्य आहे आणि शक्य नसलं तरी तीच करणं इष्ट आहे. तिची सुरुवात म्हणून सौदामिनीताईना ही सारी हकिगत तूं सांगायला पाहिजे.

**विश्राम** : ही एकच गोष्ट मला करतां येणार नाहीं!...पण ह्या तारामतीसंबंधीं काय ? तुला तिच्यासंबंधीं थोडी माहिती आहे असं दिसलं काल.

**सदानंद** : होय; थोडीशी आहे, किंबहुना होती. पण इतकी थोडी होती कीं मी तिच्याशीं लग्न करायला तयार झालों होतों!

**विश्राम** : मग?

**सदानंद** : तें लग्न झालं नाहीं आणि मी अद्यापही अविवाहित आहें! कां झालं नाहीं हें आज नक्की सांगतां येणार नाहीं. सुदैवानें माझी स्मरणशक्ति फार दुर्बळ आहे. ... पण तो महत्त्वाचा मुद्दा नाहीं. तूं तारामतीला पैसे देऊं केले नाहींस का ? तिला पैशांसंबंधीं बरंच प्रेम आहे.

**विश्राम** : ती म्हणेल ती रक्कम तिला द्यायला मी तयार होतों. परंतु तिनें साफ नकार दिला.

**सदानंद** : सर विश्वनाथांचं तत्त्वज्ञान कोसळून पडलं ! श्रीमंतांना साऱ्याच गोष्टी खरेदी करतां येत नाहींत !

**विश्राम** : हो, साऱ्याच गोष्टी खरेदी करतां येत नाहींत. तूं म्हणतोस तें खरं आहे. [निराशाधीन होऊन] सदानंद, माझा अधःपात जवळ आला आहे असं मला वाटतं. मला भीति वाटूं लागली आहे. सभोवार अंधार दाटूं लागला आहे आणि कुणाचे तरी अस्थीसारखे हात माझ्या गळ्यावर आवळूं लागले आहेत! आतां सर्वनाशांतून सुटका नाहीं !

**सदानंद :** [ टेबलावर मूठ आपटून ] विश्राम, तुला लढलं पाहिजे. लढाईच्या सुरुवातीलाच ही पराभवाची भाषा योग्य नाहीं. तारामतीवर आपल्याला विजय मिळवला पाहिजे.

**विश्राम :** [ जाग आल्याप्रमाणें ] पण कसा मिळवायचा तो ?

**सदानंद :** तें मला माहीत नाहीं, निदान ह्या क्षणाला तरी माहीत नाहीं. पण आपण प्रयत्न करायला हवा. अगदीं अभेद्य तटालाही माऱ्याच्या जागा असतात. प्रत्येक माणसांत कांहीं ना कांहीं उणीव असते, कांहीं ना कांहीं दोष असतो. खुद्द माझ्यामध्यें सुद्धा कांहीं दोष आहेत असं आमच्या वडलांचं म्हणणं आहे !

**विश्राम :** तारामतीच्या विरुद्ध मीं कोणत्याही मार्गाचा अवलंब करणं क्षम्य होईल, नाहीं का ?

**सदानंद :** अर्थातच ! सर्पाला ठेचतांना हातांत काय आहे ह्याचा विचार करायचं कारण नाहीं.

**विश्राम :** ठीक आहे. [ लिहिण्याच्या टेबलापाशीं जाऊन ] मी आतां बेळगांवला तार करून तिच्यासंबंधींची सर्व हकिगत मागवतों. तिच्या आयुष्यांत छपवण्यासारखी कांहीं गोष्ट असली तर आपल्याला तिचा उपयोग करतां येईल.

[ लिहूं लागतो. ]

**सदानंद :** विसाव्या शतकांत वावरतोस आणि सोळाव्या शतकाच्या दृष्टीनं विचार करतोस तूं विश्राम. तारामती देसाई ही संपूर्णतः आधुनिक अशी स्त्री आहे. आधुनिक स्त्रीला लोकापवादाची भीति वाटत नाहीं. नव्या पातळाइतकाच तो त्यांना प्रिय आणि प्रदर्शनीय वाटतो. ह्या अस्त्राचा तारामतीवर परिणाम होणार नाहीं.

**विश्राम :** परंतु हकिगत मागवायला तर हरकत नाहीं ? [ बेल वाजवतो. ]

**सदानंद :** मुळींच नाहीं.

[ महादेव प्रवेश करतो. ]

**विश्राम :** महादेव, केशवराव आले आहेत का ?

**महादेव :** जी, आले आहेत.

**विश्राम :** हें ताबडतोब त्यांना पाठवायला सांग.

**महादेव :** जी साहेब. [ कागद घेऊन जातो. ]

**सदानंद** : ह्या चौकशींतून तारामतीची एखादी भानगड गळाला लागेल, नाहीं असं नाहीं. तारामती ही सुंदर स्त्री आहे आणि सौंदर्य आहे तिथें भानगड आहे. परंतु अशी एखादी भानगड वेशीवर टांगण्याच्या कल्पनेनें तारामती भयभीत होईल हें संभवनीय नाहीं. खालीं मान घालून रस्त्याच्या कडेनें चालणारी ती अबला नाहीं, प्रबलांना पादाक्रान्त करूं पाहाणारी एक धाडसी स्त्री आहे ती !

**विश्राम** : शेवटपर्यंत मला झगडलं पाहिजे. हातीं येईल ती गोष्ट हत्यारासारखी वापरायला पाहिजे. ... [ आंत सौदामिनी महादेवला हाक मारते. ] सौदामिनी येते आहे वाटतं. मी जातों आतां. तारेचं उत्तर आलं, कीं लगेच कळवीन तुला.

[ विश्राम बाहेरच्या बाजूला जातो आणि सौदामिनी दुसऱ्या बाजूनें आंत येते. ]

**सौदामिनी** : आत्तां होते इथें. गेले वाटतं पुन्हा तिकडे ?

**सदानंद** : कांहीं महत्त्वाचीं पत्रं लिहायचीं आहेत त्याला.

**सौदामिनी** : पण माणसाला कांहीं विश्रांतीची जरूर असते कीं नाहीं ?

**सदानंद** : ज्यांना काम करायची सवय नाहीं त्यांनाच विश्रांतीची आवश्यकता असते. मी नेहमीं विश्रांति घेत असतों ह्याचं कारण हेंच आहे. काम करायची सवय नसल्यामुळें मला विश्रांति घ्यायची सवय जडली आणि विश्रांति घेण्याची सवय आतां इतकी वाढली कीं काम करायची सवय त्यामुळें नाहींशी झाल्यासारखी आहे.

**सौदामिनी** : तुम्हांला काम करायची सवय नाहीं हें विश्रामसारख्या तुमच्या मित्रांचं मोठं भाग्य आहे... पण तें राहूं द्या. मला तुमच्याशीं थोडंसं बोलायचं आहे.

**सदानंद** : तारामतीबद्दल ?

**सौदामिनी** : होय, तिच्याचबद्दल. काल रात्रीं तिनें सांगितलं तें खरं असल्याचं नंतर मला कळलं. अर्थात् तिला दिलेला शब्द परत घ्या म्हणून मीं विश्रामना सांगितलं आणि त्याप्रमाणें त्यांनीं तिला ताबडतोब पत्रही पाठवलं.

**सदानंद** : होय, विश्रामनें सांगितलं तें मला.

**सौदामिनी** : विश्राम तिच्या सांगण्याप्रमाणें वागले असते तर त्यांच्या विशुद्ध, थोर जीवनाला मोठाच कलंक लागला असता. नाहीं, विश्राम इतर लोकांप्रमाणें कधीं वागले नाहींत नि वागणारही नाहींत. मोठेपणा मिळवण्यासाठीं

नीतीची किंमत द्यावी लागते असं म्हणतात. पण साफ खोटं आहे तें! आपल्या आदर्श, शुद्ध, पवित्र जीवनानं विश्रामनीं तें खोटं ठरवलं आहे. [सदानंदाकडे पाहाते आणि क्षणभर थांबते.] तुम्हांला नाहीं असं वाटत? तुम्ही विश्रामचे, आमचे जिव्हाळ्याचे मित्र आहांत. माझ्याइतकेच तुम्हीही विश्रामना ओळखतां. विश्रामनीं कोणतीही गोष्ट माझ्यापासून लपवलेली नाहीं आणि तुमच्यापासूनही लपवली असेल असं मला वाटत नाहीं.

**सदानंद :** नाहीं, माझ्यापासून त्यानं कोणतीही गोष्ट लपवलेली नाहीं. निदान लपवली नसेल असं वाटतं.

**सौदामिनी :** विश्रामच्या जीवनांत लपवण्यासारखंच कांहीं नाहीं.

**सदानंद :** खरं आहे तें. पण... [घोटाळतो.]

**सौदामिनी :** पण काय?

**सदानंद :** स्पष्टपणानें बोलूं?

**सौदामिनी :** तुम्हांला संकोच करायचं कांहींच कारण नाहीं. विश्रामच्या जीवनांत कांहीं दडवण्यासारखं आहे किंवा असेल असं तुम्हांला वाटतं?

**सदानंद :** [एकदम] नाहीं, तसं नाहीं! पण... सौदामिनीताई, जीवनाच्या प्रत्यक्ष व्यवहारामध्यें...

**सौदामिनी :** [स्मित करीत] ज्याची तुम्हांला काडीमात्र कल्पना नाहीं!

**सदानंद :** ज्याचा मला अनुभव नाहीं, पण ज्याची मला माहिती आहे. ...तर माझं म्हणणं असं कीं प्रत्यक्ष व्यवहारामध्यें माणसाला आपल्या तत्त्वनिष्ठेला पुष्कळदा मुरड घालावी लागते. मानस सरोवरांतलं पाणी फार शुद्ध असेल, पण जगाच्या उपयोगासाठीं नदीच्या रूपानें तें जेव्हां खालच्या पातळीवर येतं तेव्हां मार्गातली माती मिसळून तें थोडंसं मलीन झाल्याशिवाय राहात नाहीं!

**सौदामिनी :** [कुतूहलानें] काय म्हणायचं आहे तुम्हांला?

**सदानंद :** मला सांगायचं इतकंच कीं माणसाला आपल्या महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं एखाद्या वेळीं अंतःकरणाला न पटणारी गोष्ट करावी लागते... अर्थात् मी हा सामान्य सिद्धान्त सांगतों, कुठल्याही व्यक्तीसंबंधीं बोलत नाहीं.

**सौदामिनी :** [गंभीरपणानें] तुमच्या बोलण्यांतील हे शेवटचे शब्दच मला विशेष महत्त्वाचे वाटतात. पण सदानंद, असं कां बोलतां तुम्ही?

**सदानंद** : सौदामिनीताई, जीवनाकडे पाहाण्याची तुमची दृष्टि फार कठोरपणाची, निर्दयपणाची आहे असं मला वाटतं. थोर मनुष्य म्हणजे कांहीं एखादा संगमरवरी पुतळा नव्हे, कीं तो कोणत्याही मोहाला बळी पडणार नाहीं. राजकारणी, महत्त्वाकांक्षी माणसाच्या बाबतींत तर हें विशेषच ध्यानांत घेतलं पाहिजे. उदाहरणार्थ, माझ्या वडलांनीं म्हणा अथवा विश्रामनें म्हणा, बऱ्याच वर्षांपूर्वी एखादी खुळेपणाची गोष्ट केली असली ......

**सौदामिनी** : खुळेपणाची म्हणजे ?

**सदानंद** : म्हणजे त्यांच्या आजच्या मोठेपणाशीं विसंगत असलेली, त्यांच्या आजच्या तत्त्वनिष्ठेला बाध आणणारी. अर्थात् मीं केवळ उदाहरण म्हणून घेतलं हें.

**सौदामिनी** : तुमचं उदाहरणच मुळांत चूक आहे. विश्रामच्या हातून वाईट गोष्ट व्हायची नाहीं त्याप्रमाणें असा खुळेपणाही व्हायचा नाहीं.

**सदानंद** : [सांगायचें तें सांगणें आपल्याला जमत नाहीं हें लक्षांत आल्यामुळें थोड्या उद्वेगानें] ह्या अपूर्ण जगांत अशी एकही व्यक्ति नाहीं कीं जिच्या हातून एखादी अयोग्य अथवा वेडेपणाची गोष्ट होणार नाहीं.

**सौदामिनी** : [किंचित् हसून] आश्चर्य आहे! तुम्ही अखेरी निराशावादावर आलांत!

**सदानंद** : मी निराशावादी नाहीं. [उठून] खरं सांगायचं सौदामिनीताई, तर निराशावाद म्हणजे काय हेंही मला चांगलंसं माहीत नाहीं. मला एकच गोष्ट कळते, जीवन सुसह्य करण्यासाठीं, समजावून घेण्यासाठीं उदार दृष्टिकोनाची आवश्यकता आहे. सततच्या आणि मूर्खपणाच्या उपयोगामुळें अर्थशून्य झालेल्या प्रेम ह्या एका शब्दांतच जीवनाचा सारा अर्थ आहे, सारं तत्त्वज्ञान आहे... सौदामिनीताई, तुमच्यावर कधींही आणि कसलंही संकट आलं तर ... तर तुम्ही मला ताबडतोब कळवा. माझ्या स्नेहावर आणि साहाय्यावर विश्वास ठेवा.

**सौदामिनी** : [त्याच्याकडे आश्चर्यानें बघत] सदानंद, तुम्ही फार गंभीरपणानें बोलतां आहांत. इतक्या गंभीरपणानें तुम्ही पूर्वी कधीं बोलल्याचं मला आठवत नाहीं.

**सदानंद** : [हसून] माफ करा सौदामिनीताई. असा अपराध एखाद्या वेळीं होऊन जातो. पुन्हा कधीं व्हायचा नाहीं तो! जातों मी.

**सौदामिनी :** परंतु तुम्ही गंभीर व्हावं अशीच माझी इच्छा आहे.

[पुष्पा आंतून प्रवेश करते.]

**पुष्पा :** वहिनी, गंभीर चेहेऱ्याचे अनेक पुतळे ह्या मुंबई शहरांत चौकाचौकांतून पहारा करीत आहेत. त्यांत आणखी एकाची भर पडण्याचं कारण नाहीं!

**सौदामिनी :** पुतळ्यांना सुद्धा पाहिजे तेव्हां हसवण्याचं सामर्थ्य बायकांत असतं कीं!

[सौदामिनी पुष्पाकडे पाहून किंचित् हसते आणि आंत जाते.]

**पुष्पा :** सदानंद, तुम्ही मुळींच गंभीर होऊं नका हो. डोक्यावर पगडी आणि आंगावर पेशवाई आंगरखा चढवल्यासारखे वाटाल तुम्ही!

**सदानंद :** काळजी करूं नकोस पुष्पा. निदान तूं समोर असल्यावर मी कधींच गंभीर होणार नाहीं!

**पुष्पा :** [सरोष] म्हणजे काय? मी काय नाटकांतलं एखादं विनोदी पात्र आहें वाटतं?

**सदानंद :** आपण सर्वजण विनोदी पात्रंच आहोंत. संसार म्हणजे एक रंगभूमि आहे म्हणून शेक्सपियरनें सांगितलं, पण ह्या रंगभूमीवर नाटक चालू नसून एक प्रहसन चालू आहे हें सांगायला तो विसरला. ठीक आहे. जातों आतां.

**पुष्पा :** कां?

**सदानंद :** काम आटोपलंय् माझं.

**पुष्पा :** अस्सं! मला पाहिल्याबरोबर तुमचं काम आटोपलं वाटतं? मीं पाहून ठेवलं आहे, मी आलें कीं तुम्ही जायला निघतां!

**सदानंद :** तुझ्या सौंदर्याचा प्रभाव आहे हा!

**पुष्पा :** सौंदर्यामुळें माणसं जवळ येतात म्हणून ऐकलं होतं. तुमचं मत वेगळं दिसतं!

**सदानंद :** माझीं बहुतेक मतं वेगळीं आहेत आणि खरींही आहेत. सौंदर्यामुळें माणसं जवळ येतीं तर पुण्याची सारी वस्ती खंडाळ्याच्या घाटांत जाऊन राहिली असती! देवाप्रमाणें सौंदर्याचीही माणसं पूजा करतात आणि त्याच्यापासून दोन हात दूर राहातात.

**पुष्पा :** सौंदर्यापासून, निदान सुंदर स्त्रियांपासून पुरुष दोन हात दूर राहातात ह्याला पुरावा नाहीं. वाजवीपेक्षां थोडेसे जास्तच जवळ येण्याचा प्रयत्न करतात ते!

**सदानंद :** त्याचं कारण, ज्यांना आपण लांबून सुंदर समजत होतों त्या तितक्या सुंदर नाहींत हें त्यांना कळून येतं. दिसतं तसं नसतं हा न्याय सुंदर स्त्रियांच्या बाबतींत फार खरा आहे.

**पुष्पा :** मग एखाद्या कुरूप कुब्जेशींच लग्न करणार असाल?

**सदानंद :** मुळींच नाहीं. सौंदर्याची उणीव भरून काढण्यासाठीं कुरूप स्त्रियांना बुद्धिमान् व्हावं लागतं आणि बुद्धिमान् स्त्री ही दिवसा उगवलेल्या चंद्रासारखी मला अगदीं असह्य वाटते. डोळे मिटून शेवटीं एखाद्या सुंदर स्त्रीशींच लग्न करणं भाग आहे!

**पुष्पा :** अग आई! मोठीच आपत्ति ओढवणार आहे आपल्यावर. त्यापेक्षां लग्नच करायचं नाहीं अशी भीष्मप्रतिज्ञा कां नाहीं करीत?

**सदानंद :** भीष्मानें आपल्या बापासाठीं लग्न न करण्याचा निर्धार केला. मला बापाच्या इच्छेसाठीं तरी लग्न करणं जरूर आहे आणि एकंदरींत लग्न करणं बरं असं मला वाटतं. त्यामुळें माणसाला मोकळीक मिळते, स्वातंत्र्याचा लाभ होतो. वाइटांतील वाईट विवाहित जीवनसुद्धा अविवाहित जीवनापेक्षां अधिक सुखकारक असतं. एकच भीति लग्नामध्यें असते...

**पुष्पा :** आणि ती म्हणजे मुलं होण्याची! होय ना?

**सदानंद :** नाहीं. ती म्हणजे मुलं न होण्याची! बायकोला मूल झालं नाहीं तर ती नवऱ्यालाच मूल समजून त्याच्या मागें लागते आणि त्यामुळें विवाहानें मिळणारं त्याचं स्वातंत्र्य कमी होतं. ठीक, आतां जायलाच हवं मला.

**पुष्पा :** तें तर तुमच्या बोलण्याचं पालुपदच आहे! इतकी गर्दी कां हो करतां? मला तुम्हांला किती तरी गोष्टी सांगायच्या आहेत!

**सदानंद :** मेट्रोंत लागलेला एखादा नवा सिनेमा, बसमध्यें किंवा रस्त्यावर दिसलेलं एखादं नवीन पातळ किंवा तिरंगी वेष्टनचित्र असलेली एखादी नवी कादंबरी, ह्यांतच जमा आहे ना तें सारं?

**पुष्पा :** ह्या गोष्टींना सुद्धा कांहीं महत्त्व नाहीं वाटतं?

**सदानंद :** माझ्या दृष्टीनें तरी या गोष्टींनाच विशेष महत्त्व आहे. पण

दुर्दैवानें ह्याहून कमी महत्त्वाचीं आणि कमी मनोरंजक अशीं कांहीं कामंही माणसाला करावीं लागतात !

**पुष्पा :** कामं ? ह्या दोन अक्षरांतल्या एका अक्षराशीं तरी तुमचा कधीं संबंध आला आहे का ? जीवनाच्या नाटकामध्यें किंवा तुमच्या म्हणण्यानुसार प्रहसनामध्यें तुम्हांला फक्त बोलण्याचंच काम आहे.

**सदानंद :** जीवनांत काय किंवा नाटकांत काय, ह्याहून जास्त महत्त्वाचं काम असूंच शकत नाहीं. जो सर्वांत जास्त बोलेल तोच नाटकाचा आणि जीवनाचाही नायक ठरतो !

[ सौदामिनी प्रवेश करते. ]

**सौदामिनी :** अद्याप गेलां नाहीं वाटतं ? मघाशीं निरोप घेतलात, मला वाटलं गेलां असाल तुम्ही.

**सदानंद :** स्त्री ही पुरुषाच्या मार्गातली मोठी धोंड आहे ना ! ह्या पुष्पानेंच मला अडवून ठेवलं इतका वेळ ! पण आतां मात्र जातों. सौदामिनीताई, मीं मघाशीं सांगितलं तें लक्षांत ठेवा.

[ जातो, महादेव प्रवेश करतो. ]

**महादेव :** तारामतीबाई देसाई येऊन बसल्या आहेत. आपल्याला भेटायचं आहे त्यांना बाईसाहेब.

**सौदामिनी :** तारामती ? पाठवून दे त्यांना इकडेच.

[ महादेव जातो. ]

**पुष्पा :** ही कोण ग वहिनी तारामतीबाई देसाई ? सदानंदांना न आवडणारी बुद्धिमान् स्त्री दिसते ती. तिला काल पाहिल्यापासून मला सुद्धा बुद्धिमान् बायका आवडेनाशा झाल्या आहेत. तुझी नि तिची लहानपणची ओळख आहे ना ?

**सौदामिनी :** आहे थोडीशी.

**पुष्पा :** मग बसा तुम्ही दोघीजणी हितगुजं करीत. मी लायब्ररींत जाऊन येतें जरा. जाऊं ना ?

**सौदामिनी :** जा, आणि हें बघ, जातांना चहा पाठवायला सांग.

[ पुष्पा जाते आणि तारामती प्रवेश करते. सौदामिनी क्षणभर तारामतीकडे पाहाते आणि नंतर बसण्यासाठीं तिला मानेनें खुणावते. ]

**सौदामिनी :** बैस तारामती.

**तारामती :** माझं काम फार थोडं आहे, सौदामिनी. पण त्यापूर्वी मला तुझे अंतःकरणपूर्वक आभार मानायला हवेत.

**सौदामिनी :** कशाबद्दल ?

**तारामती :** दहा वर्षांपूर्वीप्रमाणें मला तूं तारामती म्हणून हाक मारलीस ह्याबद्दल. एका शाळेंत आणि एका वर्गात असलेल्या मुलींमध्यें औपचारिकपणा असण्याचं कारण नाहीं.

**सौदामिनी :** तुलाच आठवण नव्हती ह्या गोष्टीची काल.

**तारामती :** चारचौघांत कांहीं गोष्टी नाहीं आठवत! तुला ह्याचा अनुभव असणं शक्य नाहीं, बहुधा नसेल.

**सौदामिनी :** सुदैवानें नाहीं.

**तारामती :** [ तिच्याकडे नजर लावून ] सौदामिनी, तूं अजून पहिल्यासारखीच आहेस. तुझ्यांत मुळीं सुद्धा बदल झालेला दिसत नाहीं!

**सौदामिनी :** मी कधीं बदललें नाहीं, बदलणार नाहीं.

**तारामती :** काळ हा मोठा प्रभावी शिक्षक असतो म्हणतात; त्यानें तुला कांहींच का शिकवलं नाहीं ?

[ महादेव चहाचें तबक आणून एका छोट्या मेजावर ठेवतो आणि जातो. दोघीजणी पेले घेतात. ]

**सौदामिनी :** ज्याची मला लाज वाटेल असं कांहींही शिकवलं नाहीं. आणि तुलाही काळानें कांहीं शिकवलं नाहीं का ?

**तारामती :** एक मोठीच गोष्ट शिकवली. पाप हें एखादी वाईट गोष्ट करण्यांत नसून ती उघडकीला येण्यांत आहे हें मला समजलं. चोरीचा आळ येऊन शाळेंतनं मला निघावं लागलं, तेव्हां ही गोष्ट मला ठाऊक नव्हती.

**सौदामिनी :** [ विषय बदलण्यासाठीं ] तुझं कसलं काम होतं माझ्याकडे ?

**तारामती :** माझी एक हिऱ्याची आंगठी कुठें तरी हरवली काल. ती इथें पडली कीं काय हें विचारायचं होतं.

**सौदामिनी :** हिऱ्याची आंगठी ?

**तारामती :** आंगठी सर्पाच्या आकृतीची आहे नि फण्यांत पिवळ्या रंगाचा हिरा जडवलेला आहे. सहज चौकशी करतें. कुठें हरवली ह्याची नक्की आठवण नाहीं मला. रात्रीं सरदारगृहांत गेल्यावर माझ्या ध्यानांत आलं.

**सौदामिनी :** इथें पडली असती तर मला कळलं असतं. पण मी विचारतें. [महादेव येतो आणि चहाचें साहित्य उचलतो.] महादेव, काल दिवाणखान्यांत एखादी आंगठी आढळली का ?

**महादेव :** आंगठी ? नाहीं बाईसाहेब.

**सौदामिनी :** जा तूं.

[महादेव जातो.]

**तारामती :** दुसरीकडेच कुठें तरी पडली असावी. राहूं दे तें! [उठून आरशा-समोर जाते] सौदामिनी, मनासारखा सर्वसद्गुणसंपन्न, आदर्श पति मिळाल्यानें तूं अगदीं सुखी असशील नाहीं ?

**सौदामिनी :** तुझं काम संपलं आहे ना ?

**तारामती :** [आरशांत पाहात] होय.

**सौदामिनी :** मग एक गोष्ट तुला स्पष्टपणें सांगणं जरूर आहे तारामती. तारामती देसाई म्हणजे तूंच आहेस हें मला अगोदर कळतं तर ह्या घरांत तुझा प्रवेश झाला नसता, मीं होऊं दिला नसता!

**तारामती :** [मागें वळून स्मित करीत] खरंच? आणि ह्या बहिष्काराचं कारण ?

**सौदामिनी :** जी व्यक्ति एकदा अप्रामाणिकपणानें वागते ती संधि मिळाली तर पुन्हाही तसं वागल्याशिवाय राहाणार नाहीं. अशा माणसांपासून दूर राहाणं बरं.

**तारामती :** हा नियम सर्वांनाच लागू करतेस तूं ?

**सौदामिनी :** होय, सर्वांना! कोणीही त्याला अपवाद होऊं शकत नाहीं.

**तारामती :** [कोचावर बसत] मग तुझ्या दुर्दैवाला पारावार नाहीं सौदामिनी.

**सौदामिनी :** तेव्हां ह्या वेळेला किंवा पुन्हाही कधीं तूं मुंबईला येशील तेव्हां माझ्या घरांत पाऊल टाकतां कामा नये.

**तारामती :** [मागें रेलून] सौदामिनी, तुझ्या ह्या सोज्वळ तत्त्वनिष्ठेबद्दल आणि नीतिमत्तेबद्दल मला कांहीं म्हणायचं नाहीं. माणसाला अनीतिमान् असण्याचा अधिकार आहे त्याप्रमाणें नीतिमान् असण्याचाही आहे. पण खरोखरी ह्या प्रश्न नीतिअनीतीचा नसून आवडीनिवडीचा आहे. आपल्याला नावडणारी व्यक्ति सोइस्करपणें अनीतिमान् ठरवतां येते. सौदामिनी, माझ्याविषयीं तुझं मत चांगलं नाहीं हें मला ठाऊक आहे आणि तुझ्याविषयींही मला फार प्रेम वाटतं असं नाहीं. तरी सुद्धा तुझ्या हिताची एक गोष्ट मी तुला सांगणार आहें.

**सौदामिनी :** [तिरस्कारानें] माझ्या हिताची ! रात्रीं विश्रामना त्यांच्या हिताची गोष्ट सांगितलीस त्याचप्रमाणें ? माझं भाग्य म्हणून मी वेळेवरतीं त्यांना वांचवूं शकलें.

**तारामती :** [उठून उभी राहाते.] तूं ? तूं त्यांना तें पत्र लिहायला लावलंस ? तूं त्यांना आपलं वचन मागें घ्यायला लावलंस ?

**सौदामिनी :** होय. मींच.

**तारामती :** मग तूं त्यांना तें पाळायला लावलं पाहिजे ! सौदामिनी, मी तुला उद्यां सकाळपर्यंत वेळ देतें. ह्या मुदतींत तुझ्या नवऱ्यानें माझ्या सांगण्यानुसार वागायचं वचन दिलं नाहीं, माझ्या सूचनेला ...

**सौदामिनी :** भामटेपणाच्या, दरोडेखोरीच्या सूचनेला !

**तारामती :** तूं त्याला कांहींही नांव देऊं शकतेस. तुझा आदर्श नवरा माझ्या मुठींत आहे. ह्या बोटावर मी त्याला हवा तसा नाचवूं शकेन हें लक्षांत ठेव.

**सौदामिनी :** [संतापानें उभी राहाते.] तारामती, तुझ्या उद्धटपणाला मर्यादा राहिली नाहीं ! विश्रामचा तुझ्याशीं काय संबंध ! तुझ्यासारख्या स्त्रीशीं...

**तारामती :** [दुष्टपणें हसत] माझ्यासारख्या स्त्रीशीं ! माझ्यासारख्या स्त्रीशींच तुझ्या नवऱ्यासारख्या पुरुषाचा संबंध जास्त असतो ! अप्रामाणिकपणा ! भामटेपणा ! दरोडेखोरी ! हे सारे सद्गुण तुझ्या नवऱ्यामध्यें असल्यानें तो तुझ्यापेक्षां मलाच अधिक जवळचा आहे. तुझ्यामध्यें आणि विश्राममध्यें नीतिअनीतीची प्रचंड दरी आहे. तुझ्यापासून तो फार दूर आहे. मी मात्र त्याच्या जवळ आहें, अगदीं शेजारीं आहें. एकाच पापाच्या, एकाच गुन्हेगारीच्या साखळदंडामध्यें आम्ही दोघें आवळलीं गेलों आहोंत !

**सौदामिनी :** माझ्या विश्रामची इतकी खोटी, इतकी अधम निंदा करायचं साहस तुझ्याच्यानें होतं तरी कसं? [अनावर संतापानें] जा, आत्तांच्या आत्तां बाहेर जा, माझ्या घरांतून चालती हो.

[विश्राम समोरच्या खोलीचें दार उघडतो आणि तेथेंच उभा राहातो. काय झालें हें लक्षांत येऊन त्याचा चेहेरा पांढरा फटक पडतो.]

**तारामती :** तुझं घर! प्रामाणिकपणाच्या प्रेतावर बांधलेलं तुझं घर, दरोडेखोरीच्या पायावर उभारलेलं, तुला पवित्र वाटणाऱ्या नीतिमत्तेच्या रक्तानें रंगवलेलं तुझं घर! विचार, तुझ्या पतिराजांना विचार, ह्या घराच्या, ह्या ऐश्वर्याच्या मुळाशीं कोणतं पाप दडलं आहे तें. सरकारचा विश्वासघात करून एखाद्या अट्टल बदमाषाप्रमाणें त्यांनीं सरकारी दप्तरांतलीं रहस्यं एका श्रीमंताला विकलीं आणि त्या पापमय पैशांतून स्वतःचा उत्कर्ष साधला!

**सौदामिनी :** खोटं! साफ खोटं!

**तारामती :** [विश्रामकडे बोट दाखवीत] त्यांच्याकडे पाहा. माझ्या म्हणण्यांतील एक अक्षर खोटं आहे असें सांगण्याची त्यांची प्राज्ञा आहे?

**विश्राम :** [पुढें होऊन] जा, तारामती, जा आतां. जें करायचं तें तूं केलं आहेस!

**तारामती :** करायचं तें अद्याप केलेलं नाहीं मीं! मी उद्यां सकाळपर्यंत मुदत देतें. तोंपर्यंत मला हवा असलेला जबाब तुमच्याकडून आला नाहीं तर सर्वांना आदर्श वाटणारे आजचे गृहमंत्री कोणत्या पापावर पाय ठेवून ह्या आसनावर चढले आहेत, हें मी साऱ्या जगाला जाहीर करीन!

[विश्राम बेल दाबतो, महादेव प्रवेश करतो.]

**विश्राम :** महादेव, तारामतीबाईंना गाडींत बसवून दे.

[तारामती महादेवच्या मागोमाग जाते. जातांना नमस्ते म्हणून सौदामिनीला लवून नमस्कार करते. सौदामिनी एखाद्या पुतळ्यासारखी स्तंभित होऊन उभी असते.]

**सौदामिनी :** [भानावर येऊन] तुमच्या ऐश्वर्याची इमारत एका किळसवाण्या पापावर उभारली आहे? सरकारी दप्तरांतल्या रहस्याची विक्री करून तुम्ही

श्रीमंत झालांत ? खरं नाहीं, अगदीं खरं नाहीं ! सांगा, माझ्याशीं खोटं बोला पण हें खरं नाहीं म्हणून सांगा ! [आवेगानें कोचावर बसते.]

**विश्राम :** [तिच्याजवळ जात] तें सारं खरं आहे... पण सौदामिनी, माझं ऐकून घे. कोणत्या परिस्थितींत ती गोष्ट मीं केली हें तुला ठाऊक नाहीं. माझी सारी हकिगत एकदा ऐकशील का ?

**सौदामिनी :** माझ्याजवळ येऊं नका. माझ्या आंगाला स्पर्श करूं नका. दहा वर्षांत तुम्ही साऱ्या जगाशीं खोटं बोललांत, खोटेपणानें वागलांत, आपल्या ध्येयनिष्ठेचा आणि पवित्रतेचा मायावी देखावा जगापुढें, माझ्यापुढें सुद्धा उभा केलात ! तुम्ही स्वतःचा, स्वतःच्या प्रामाणिकपणाचा बाजारांत जाऊन लिलाव केलात ! रस्त्यावरचे रामोशी सुद्धा अधिक नेकीनें, अधिक प्रामाणिकपणानें वागत असतील !... तुमच्या सहवासानें, तुमच्या स्पर्शानें मी कायमची भ्रष्ट होऊन गेलें आहें असं वाटूं लागलं आहे मला !

**विश्राम :** सौदामिनी ! सौदामिनी ...

**सौदामिनी :** [त्याला दूर लोटीत] नका, विश्राम, जवळ येऊं नका, बोलूं नका. तुमच्या शब्दामुळें सारा भूतकाळ एखाद्या दैत्यासारखा माझ्या डोळ्यांसमोर उभा राहातो ! पूर्वस्मृतीचे जळजळीत निखारे अंतःकरणांत धगधगूं लागतात ... विश्राम, खोटेपणावर साऱ्या जीवनाचा निर्वाह केल्यानंतर माझ्याशीं एक क्षणभर खोटं कां नाहीं बोललांत ? भक्तिभावानें उभारलेलं माझं मंदिर कां असं उध्वस्त केलंत ? ... देवाप्रमाणें मी तुमची पूजा करीत होतें. माझे विश्राम उदात्त जीवनाचे आदर्श आहेत, स्वार्थाच्या चिखलांत माखलेल्या जगानें त्यांच्या पायाशीं बसून त्यागाचे, निःस्वार्थतेचे पाठ घ्यावेत असा अभिमान मला वाटत होता. तुमचा जयजयकार ऐकला, तुमचा गौरव पाहिला कीं मला जीविताचं सार्थक झाल्यासारखं वाटे ... माझ्या अंतःकरणांतलीं सारीं स्वप्नं तुमच्या रूपानें साकार झालीं आहेत, माझ्या जीवनांतली सारीं ध्येयं तुमच्या रूपानें चालतीं बोलतीं झालीं आहेत अशी माझी भावना होती. खोटं ठरलं सारं !... विश्राम, तुम्हीं मला फसवलंत, फसवून माझ्या जीवनाचा अपहार केलात, माझ्या अंतःकरणाचा, जीवनाचा आपल्या पायांखालीं चुराडा केलात ! कसं सहन करूं हें !

**विश्राम :** [स्वतःला सावरून घेतो.] सौदामिनी, मीं तुला फसवलं, फसवणुकीनें तुझ्या जीवनाचा अपहार केला असं तुला खरोखरच वाटत असेल

तर मी तुझी क्षमा मागतों, अगदीं मनःपूर्वक क्षमा मागतों. जो अपराध माझ्याकडून झाला त्याचं फार घोर, अमानुष प्रायश्चित्त मला मिळत आहे. सामाजिक जीवनांतून तर मी बहिष्कृत झालोंच, पण माझं गृहजीवन, माझं घर सुद्धा ढासळून पडलं ! ... पण सौदामिनी, एक गोष्ट कधीं विसरूं नकोस. तुझं, तुझ्या प्रेमाचं महत्त्व इतर कोणत्याही गोष्टीपेक्षां मला जास्त वाटत होतं आणि म्हणूनच ही प्रतारणा मीं तुझ्याशीं केली ... नाहीं सौदामिनी, तुम्हा स्त्रियांची ही मोठी चूक होते आहे. आमचे दोष, आमचा दुबळपणा लक्षांत घेऊन तुम्ही आमच्यावर प्रेम करूं शकत नाहीं का ? आदर्शतेच्या इतक्या उंच आसनावर तुम्ही आम्हांला कां बसवूं बघतां ? पुरुष काय, स्त्री काय, कोणीही दोषापासून पूर्णतः मुक्त असूं शकत नाहीं. मनुष्य स्वभावतः सदोष आणि दुर्बळ असतो म्हणूनच त्याला प्रेमाची आवश्यकता असते. स्वतःच्या दुर्बळतेमुळें अथवा इतरांच्या दुष्टपणामुळें अंतःकरणावर ज्या जखमा होतात या बऱ्या होण्यासाठींच प्रेमाच्या संजीवनीची जरूर असते. जो मुक्त आहे, पूर्ण आहे, आदर्श आहे, तो प्रेमाच्या मोहांत तरी कशाला सापडेल ? मला आदर्श मानून तूं देव्हाऱ्यांत माझी स्थापना केलीस आणि तुझ्या प्रेमाला मुकेन ह्या भीतीनें मीही त्या देव्हाऱ्यांतून कधीं बाहेर पडूं शकलों नाहीं. तुझ्याजवळ येऊन अंतःकरणाच्या जखमा तुला दाखवूं शकलों नाहीं, तुझ्या सहानुभूतीची अपेक्षा करण्याचा मला धीर झाला नाहीं ! परंतु आतां सारं कांहीं संपलं आहे. ज्या एका भीतीनें माझं हृदय सतत पोखरलं जात होतं ती खरी ठरली, मी तुझ्या प्रेमाला पारखा झालों. सौदामिनी, मीं तुझ्या जीवनाचा अपहार केला कीं नाहीं कुणाला ठाऊक, परंतु तूं मात्र माझ्या जीवनाचा आज चेंदामेंदा करून टाकला आहेस. तारामतीच्या म्हणण्याप्रमाणें मी वागलों असतों, मला वागायची तूं मोकळीक दिली असतीस तर माझ्या आयुष्यांतील त्या एकच एक अपराधावर मी कायमचा पडदा टाकूं शकलों असतों. तारुण्याच्या मोहावस्थेंत हातून घडलेल्या त्या एकच एक पापाला कायमचं गाडून टाकलं असतं ! माझं, आपणा दोघांचं पुढील जीवन सुखकर, पापमुक्त झालं असतं. परंतु तूं मला तसं करूं दिलं नाहींस. आपल्या अमूर्त कल्पनांसाठीं तूं माझ्या प्रत्यक्ष संसाराची धूळधाण केलीस. आतां समाजांतून हद्दपार होऊन, कुठल्या तरी कानाकोपऱ्यांत पडून एखाद्या असहाय कुत्र्याप्रमाणें जिवंत राहाण्याचा प्रयत्न करायचा आणि त्या प्रयत्नांतच एके दिवशीं नामशेष व्हायचं ! इतकंच शक्य राहिलं

आहे मला! जिच्यावर मीं प्राणांपेक्षां अधिक प्रेम केलं तिनेंच अखेर माझा सर्वनाश केला! सर्वनाश!!

[ विश्राम समोरील दालनांत निघून जातो. सौदामिनी एकदम उठून त्याच्या पाठोपाठ जाते, पण दरवाजा बंद होतो. ती परत मागें येते, जमिनीवर बसून कोचावर मान टाकते आणि एखाद्या लहान मुलासारखी हुंदके देऊन रडूं लागते. ]

# ३

[रात्रीं ९-९॥ ची वेळ. सदानंद आपल्या खोलींत आरामखुर्चीवर बसला आहे. हातांत एक ग्रंथ आहे, जवळ इतर कांहीं ग्रंथ आणि वृत्तपत्रें पडलीं आहेत. खोलींतून दुसऱ्या दोन दालनांत जाण्यासाठीं दोन दरवाजे आहेत. खोलींत कांहीं खुर्च्या, पुस्तकांचीं कपाटें वगैरे ठेवलेलीं आहेत. सदानंदचा नोकर भीमराव ह्या खोलींत येऊन पुस्तकांची व कागदांची आवराआवर करतो.]

**सदानंद** : [कंटाळून पुस्तक बाजूला ठेवीत] भीमराव, जरा तो सिगारेटचा डबा घे पाहूं !

**भीमराव** : होय साहेब.

[सदानंद डबा घेऊन एक सिगारेट काढतो.
भीमराव काडी ओढून ती पेटवतो.]

**सदानंद** : भीमराव, सिगारेट ओढतांना प्रत्येक वेळीं माझ्या डोक्यांत एक विचार येतो.

**भीमराव** : साहजिक आहे साहेब.

**सदानंद** : कसला विचार येत असावा ?

**भीमराव** : सिगारेट सोडण्याचा, साहेब.

**सदानंद** : होय, वस्तुतः सृष्टिक्रमानुसार तोच विचार यायला पाहिजे. लग्न केल्यावर घटस्फोटाचा, नोकरी धरल्याबरोबर राजीनामा देण्याचा किंवा आत्महत्या

करूं लागतांच जिवंत राहाण्याचा विचार मनांत येणं जितकं स्वाभाविक आहे तितकंच सिगारेट पेटवल्याबरोबर ती सोडावी असं वाटणं स्वाभाविक आहे. परंतु भीमराव, स्वाभाविक विचार माझ्या मनांत कधीं येत नाहींत!

**भीमराव** : होय साहेब.

**सदानंद** : उदाहरणार्थ ?

**भीमराव** : लग्न करणं, संसार करणं, वगैरे, साहेब.

**सदानंद** : ह्या गोष्टी काय स्वाभाविक आहेत? लग्न करण्याइतकी दुसरी कोणतीही गोष्ट अस्वाभाविक नाहीं.

**भीमराव** : पटत नाहीं साहेब.

**सदानंद** : हजार वर्षांपूर्वी तुझ्या पूर्वजांनीं लग्न केल्याचा कांहीं पुरावा आहे ?

**भीमराव** : न केल्याचाही पुरावा नाहीं साहेब.

**सदानंद** : तूं पुस्तकं वाचीत नाहींस म्हणून असं बोलतोस भीमराव.

**भीमराव** : फार वाचूं नये असं माझं मत आहे, साहेब.

**सदानंद** : कारण?

**भीमराव** : पुस्तकं वाचल्यामुळें माणसाच्या अज्ञानांत फार भर पडते साहेब.

**सदानंद** : हें कुठें ऐकलंस तूं?

**भीमराव** : आपल्याच तोंडून ऐकलं साहेब.

**सदानंद** : चांगलं! विश्राम युगाच्या शस्त्रानें युगाशीं लढला त्याप्रमाणें तूं माझ्या शस्त्रानें माझ्याशीं लढूं लागला आहेस!

**भीमराव** : होय साहेब... आपलं... नाहीं साहेब.

**सदानंद** : पण मुख्य तें सांगायचं राहिलंच. सिगारेट पेटवतांना माझ्या डोक्यांत असा विचार येतो भीमराव, कीं माणसाचं जीवन हें सिगारेटसारखं आहे !

**भीमराव** : बरोबर आहे साहेब, सिगारेटप्रमाणें त्यालाही शेवटीं काडी लावावी लागते !

**सदानंद** : होय, पण मला तें म्हणायचं नाहीं. माणसाचं जीवन म्हणजे नुसता सिगारेटचा धूर आहे भीमराव! सुंदर दिसतो, क्षणभर तल्लफ भागवतो पण प्रत्यक्षांत मात्र कांहीं नाहीं!

**भीमराव** : लग्न करून टाका साहेब.

**सदानंद** : म्हणजे काय होईल ?

**भीमराव** : जीवन म्हणजे केवळ धूर नसून त्याच्या मुळाशीं अग्नि आहे हें समजून येईल.

**सदानंद** : सर्वच जण हल्लीं माझ्या लग्नाबद्दल बोलूं लागले आहेत. माझं लग्न हा आतां वैयक्तिक प्रश्न राहिला नसून सामाजिक प्रश्न होऊन बसला आहे ! असं कां व्हावं भीमराव ?

**भीमराव** : वय वाढत चाललंय् साहेब !

**सदानंद** : विलायतेंत म्हातारपणीं लग्न करतात लोक !

**भीमराव** : तिकडची हवा थंड आहे साहेब.

**सदानंद** : ठीक आहे, ह्या उन्हाळ्यांत करून टाकतों लग्न भीमराव.

**भीमराव** : देव पावला ! आतां एक पत्र आलं आहे साहेब, आणून देतों.

**सदानंद** : पत्र ? ह्या वेळीं ?

**भीमराव** : एका नोकरानें आणून दिलं. गुलाबी पाकिटांत आहे साहेब. [जातो.]

**सदानंद** : सैतानाचं नांव काढतांच तो समोर येऊन उभा राहातो म्हणतात. त्याचप्रमाणें लग्नाचं नांव निघतांच गुलाबी पाकिटांतलीं पत्रं समोर येऊं लागलीं ! कुणाचं असेल हें पत्र ? [ भीमराव पत्र आणून देतो. ] भीमराव, क्लबांत नानासाहेब आले असतील. मी आतां क्लबांत येतों म्हणून त्यांना फोन कर.

**भीमराव** : होय साहेब. [ जातो. ]

**सदानंद** : [ पत्र फोडून आंतील कागदावर नजर टाकतो आणि दचकतो. ] हें सौदामिनीताईचं पत्र ! "मला तुमच्या भेटीची फार फार आवश्यकता आहे. मी तुमच्याकडे येत आहें—सौदामिनी" !

[ गोंधळून पत्र खालीं ठेवतो. पुन्हा उचलतो आणि मोठ्यानें वाचतो. ]

"मला तुमच्या भेटीची फार फार आवश्यकता आहे. मी तुमच्याकडे येत आहें—सौदामिनी" ! माझ्या भेटीची आवश्यकता ! सौदामिनीला सारं कांहीं समजलेलं दिसतं ! विश्रामनें दहा वर्षांपूर्वी केलेल्या पापाच्या पिशाचानें अखेर आपलं वैर साधलं, त्याच्या प्रफुल्ल संसारावर आपला अमंगल हात फिरवला असं दिसतं. नाहीं, कांहींही करून सौदामिनीला ह्या

वेडेपणापासून वांचवलं पाहिजे. ह्या संकटांतून विश्रामची सुटका केली पाहिजे.

[भीमराव येतो.]

**भीमराव :** फोन केला साहेब. नानासाहेब आपली वाट पाहाणार आहेत.

**सदानंद :** ठीक आहे. आतां पुन्हा फोन कर आणि मी येणार नाहीं म्हणून त्यांना कळव.

**भीमराव :** होय साहेब. बाहेर बाबासाहेब आले आहेत. इकडे येताहेत ते!

[जातो.]

**सदानंद :** बाबासाहेब आले! [कपाळाला हात लावतो, घड्याळाकडे पाहातो.] दहा वाजायला आले, आतां सौदामिनीताई येतील. भलत्या वेळेला समोर येऊन उभा राहातो तो आपला बाप असा सिद्धान्त बांधायला हरकत नाहीं! आतां कांहीं तरी युक्ति योजली पाहिजे.

[ रावबहादुर चौफेर पाहात प्रवेश करतात. ]

**रावबहादुर :** घरीं आहांत! मोठं नशीब आमचं!

**सदानंद :** नाहीं बाबासाहेब, आत्तां क्लबांत जाणार होतों, म्हणजे ... खरं सांगायचं म्हणजे आत्तां जायचं आहे. थोडंसं काम आहे महत्त्वाचं!

**रावबहादुर :** क्लबांत जातां जातां मी म्हातारा झालों आहें! क्लबांत महत्त्वाचीं कामं असतात हें कधीं ध्यानांत आलं नाहीं माझ्या! ... ती खुर्ची करा पुढें जरा.

**सदानंद :** होय बाबासाहेब.

[ खुर्ची पुढें करतो. रावबहादुर बसतात. ]

**रावबहादुर :** हा ओव्हरकोट काढा पाहूं! पुण्याच्या थंड हवेंत गरम कोटाची सवय झाली आम्हांला पण इथें मुंबईत कांहीं उपयोग नाहीं त्याचा. मुंबईतला हिवाळा म्हणजे उन्हाळ्याचाच एक प्रकार!

**सदानंद :** फार वाईट हवा आहे बाबासाहेब इथली. त्या मानानें आपण उतरलांत तिकडे म्हणजे सरदारगृहाच्या बाजूला हवा चांगली असते जरा!

**रावबहादुर :** सरदारगृह? सव्वाशें मैलांचं अंतर ओलांडून आपला बाप पुण्याहून इथें येतो तो कुठें उतरतो, राहातो ह्याचा तरी पत्ता आहे का तुम्हांला? माधवाश्रमांत उतरत असतों मी सध्या. आपलं ध्यानांत असूं द्या.

**सदानंद :** माधवाश्रम ना ? तिकडची हवा तर फारच चांगली आहे आणि इथून जास्त जवळही आहे तो. गाडी बोलवायला सांगूं का ?

**रावबहादुर :** गाडी बोलवायची कांहीं आवश्यकता नाहीं ! आमची प्रकृति इतकी नाजूक झाली नाहीं अजून. पुण्याला असलों म्हणजे रोज सकाळीं कॉलेजच्या बाजूला पांच मैलांची आम्ही रपेट करतों आणि तुम्हीही आतां क्लबांत जाण्याचा विचार बाजूला ठेवा. लौकर झोपायची सवय करा आतां. प्रकृतीला फार चांगलं असतं तें.

**सदानंद :** होय बाबासाहेब, आजपासूनच सुरुवात करावी म्हणतों. आत्तांच झोप येऊं लागली आहे मला.

[ जांभई देतो व उठतो. ]

**रावबहादुर :** कांहीं झोप येत नाहीं इतक्या लौकर. बसा नीट त्या खुर्चीवर. मला कांहीं महत्त्वाचं बोलायचं आहे तुमच्याशीं.

[ सदानंद घड्याळाकडे पाहात असहायपणें खालीं बसतो. ]

**रावबहादुर :** मला एक महत्त्वाचा प्रश्न तुम्हांला विचारायचा आहे.

**सदानंद :** माझी प्रकृति सध्या बरी नाहीं बाबासाहेब. डॉक्टरनीं मला सांगितलंय्, रात्रीं नऊच्या पुढें कसलेही महत्त्वाचे विचार करूं नका म्हणून !

**रावबहादुर :** बाहेर जाऊन कांहीं अविचार करण्यापेक्षां घरीं राहून विचार करणं प्रकृतीला जास्त बरं. बसा नीट ! तुमच्या प्रकृतीला कांहीं झालेलं दिसत नाहीं मला !

**सदानंद :** म्हातारपणीं नजर चांगली राहात नाहीं म्हणतात.

**रावबहादुर :** माझी प्रकृति चांगली आहे त्याप्रमाणें नजरही चांगली आहे अजून. फर्ग्युसन कॉलेजच्या टेकडीवर उभा राहिलों तर रस्त्यावरचीं माणसं देखील स्पष्ट दिसतात मला.

**सदानंद :** नजर चांगली नसल्याचा हा पुरावा आहे बाबासाहेब !

**रावबहादुर :** तें राहूं द्या. माझ्या दृष्टीची चर्चा करायला असा रात्रीं दहा वाजतां झोपमोड करून मी तुमच्याकडे आलों नाहीं. मला तुमच्यासंबंधीं चर्चा करायची आहे.

**सदानंद :** माझ्यासंबंधीं चर्चा ? मी म्हणजे काय एखाद्या प्रसिद्ध दिग्दर्शकाचा पहूं पाहाणारा बोलपट आहें कीं एखाद्या नामवंत लेखकाची अश्लील कादंबरी आहें ? माझ्यासंबंधीं चर्चा काय म्हणून ?

**रावबहादुर :** तुमच्यासंबंधीं चर्चा म्हणजे तुमच्या लग्नाची चर्चा !

**सदानंद :** लग्नाची चर्चा ? ह्या भलत्या वेळेला ? बाबासाहेब, दहा वाजायला आले आहेत आतां !

**रावबहादुर :** मग दहा वाजले म्हणून काय झालं ? ताडीचीं दुकानं आठ वाजतां बंद व्हावींत असा कायदा आहे, त्याप्रमाणें लग्नाच्या चर्चेला कांहीं घड्याळाचं बंधन आहे कीं काय ?

**सदानंद :** तसं नाहीं बाबासाहेब, ही वेळ म्हणजे डोळा लागण्याची असते. लग्नासारख्या प्रश्नाचा विचार अगदींच असा डोळे मिटून करणं बरं नव्हे.

**रावबहादुर :** तुमचा डोळा लागणार नाहीं ह्याची काळजी घ्यायला मी समर्थ आहें. बोला, तुम्ही लग्न कधीं करणार ?

**सदानंद :** करूं या केव्हां तरी ...

**रावबहादुर :** केव्हां तरी ? गेलीं कित्येक वर्षं तुमचे हे दोन शब्द मी ऐकतों आहें ! प्रत्येक गोष्टीप्रमाणें लग्नालाही ठरावीक वेळ असते. दांत पडल्यावर आणि केस पांढरे झाल्यावर लग्न करीत असतात का ?

**सदानंद :** तसं माझं वय अजून फार झालं नाहीं, बाबासाहेब.

**रावबहादुर :** साहेब, तुमचं वय तुमच्यापेक्षां तुमच्या बापाला जास्त माहीत आहे. येत्या वैशाखांत चौतिसावं वर्षं लागेल तुम्हांला ! तेहतीस वर्षांच्या आयुष्यांत, लग्नासारखी घरबसल्या करतां येण्यासारखी गोष्टही तुम्हांला करतां येऊं नये ही लज्जेची गोष्ट आहे. विश्रामचा कित्ता जरा गिरवा ! तुमच्यापेक्षां फार तर दोन तीन वर्षांनीं मोठा असेल तो. एवढ्या अमदानींत त्यानें किती गोष्टी केल्या ! कीर्ति कमावली, संपत्ति मिळवली आणि आज प्रांताचा मंत्री झाला आहे. उद्यां पंतप्रधान सुद्धा होईल तो. आणि तुम्हांला अद्याप नुसतं लग्न सुद्धा करतां येऊं नये ? [एकदम आंग शहारल्याप्रमाणें करून] किती वारा येतो इथें ! ह्या खिडक्यांना पडदे सुद्धा लावूं शकलां नाहीं तुम्ही आजवर ?

**सदानंद :** [कांहीं तरी मार्ग सापडल्याच्या आनंदानें उभा राहून] बाबासाहेब, ह्या खोलीला वारा फार आहे आणि हा समुद्रावरचा वारा ह्या दिवसांत फारच वाईट

असतो म्हणतात! चला, आपण पलीकडच्या खोलींत बसूं. बघा हा तुम्हांला खोकला आला!

**रावबहादुर :** [उठून] माझ्या इच्छेनुसार केव्हांही खोकण्याचा मला हक्क आहे असं मीं समजतों!

**सदानंद :** अर्थातच! परंतु माझं मत असं आहे, वृद्ध माणसांनीं शक्य तों खोकूं नये. त्यामुळें ते तरुण आहेत कीं काय अशी शंका उत्पन्न होते!

**रावबहादुर :** [मागें वळून त्याच्याकडे रोखून बघत] तुम्ही काय बोलत असतां ह्याचा अर्थ तुम्हांला स्वतःला तरी कधीं समजतो का?

**सदानंद :** जेव्हां मी कांहीं तरी अर्थहीन बोलतों तेव्हां समजतो!

[ 'हंः' करून रावबहादुर उजवीकडील दालनांत जातात. सदानंद दारापासून मागें येतो व बेल वाजवतो.]

[ भीमराव प्रवेश करतो. ]

**सदानंद :** भीमराव, मस्तक जागेवर ठेवण्याचा प्रसंग आहे.

**भीमराव :** होय साहेब.

**सदानंद :** हें पाहा, आत्तां एक बाई माझ्याकडे कांहीं महत्त्वाच्या कामासाठीं येणार आहेत. त्या आल्या कीं त्यांना ह्या शेजारच्या दिवाणखान्यांत बसायला सांग. विसरूं नकोस किंवा चुकूं नकोस.

**भीमराव :** नाहीं साहेब.

**सदानंद :** आणि त्यांच्याशिवाय इतर कुणीही आलं तरी त्याला घरांत प्रवेश करूं द्यायचा नाहीं. मी बाहेर गेलों आहें म्हणून सांग, समजलास?

**भीमराव :** होय साहेब. [बेल वाजते.]

**सदानंद :** आल्याच वाटतं! थांब. मीच जातों.

[ बाहेर जाऊं लागतो, तोंच रावबहादुर दार उघडून बाहेर डोकावतात. ]

**रावबहादुर :** मी इथें बसलों आहें ह्याचा विसर पडला वाटतं? तुमच्याकडे नोकरीसाठीं अर्ज घेऊन आलों नाहीं मी असा तिष्ठत बसायला!

**सदानंद :** होय बाबासाहेब, आलों मी. [परत मागें फिरतो. जातांना— ] मीं सांगितलेलं लक्षांत ठेव भीमराव.

**भीमराव :** होय साहेब.

[ दोघे आंत जातात आणि तारामती प्रवेश करते. ]

**तारामती :** सदानंद इथें नाहींत का? ते आंत आहेत म्हणून बाहेर समजलं मला.

**भीमराव :** बाबासाहेब आले आहेत, त्यांच्याशीं ते बोलताहेत बाईसाहेब.

**तारामती :** रात्रीं दहा वाजतां वडिलांशीं एकान्तांत बोलताहेत? आश्चर्य आहे!

**भीमराव :** साहेबांनीं आपल्याला ह्या दिवाणखान्यांत बसायला सांगितलं आहे. पांच दहा मिनिटांत ते तिकडे येतील.

**तारामती :** [आश्चर्यानें भीमरावाकडे पाहात] मला बसायला सांगितलं? मी येणार हें सदानंदांना ठाऊक होतं?

**भीमराव :** होय बाईसाहेब.

**तारामती :** खरंच?

**भीमराव :** आपल्याला ह्या दिवाणखान्यांत बसायला सांगितलं आहे त्यांनीं.

**तारामती :** [हसत स्वतःशीं] सदानंद कुणाची तरी वाट पाहात होते, तेवढ्यांत त्यांच्या वडिलांनीं घोटाळा केलेला दिसतो! [भीमरावास] माझी एक छोटी बॅग बाहेर व्हरांड्यांतील बाकावर राहिली. तेवढी घेऊन येण्याची व्यवस्था होईल का?

**भीमराव :** होय बाईसाहेब. [जातो.]

**तारामती :** [खोलीचें निरीक्षण करूं लागते.] काय हा रुक्ष संसार सदानंदांचा! स्त्रीचा हात लागल्याशिवाय घराला शोभा येत नाहीं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं! ... ह्या संसाराची स्वामिनी म्हणून इथें येतांच हें सारं कांहीं मला बदलून टाकावं लागेल! [टेबलापाशीं जाते.] किती कागदांचा आणि पत्रांचा पसारा हा! नि हें गुलाबी कागदावर लिहिलेलं पत्र कुणाचं? प्रेमपत्रांचा रंग गुलाबीच पाहिजे ही सनातन कल्पना अद्यापही कांहीं प्रणयिनींच्या डोक्यांत जिवंत आहे असं दिसतं! [पत्र उचलते.] वा! हें तर आमच्या सौदामिनीबाईचं पत्र! [वाचते] "मला तुमच्या भेटीची फार फार आवश्यकता आहे. मी तुमच्याकडे येत आहें.——सौदामिनी." सौदामिनी!

[तिच्या डोळ्यांत विजयाची भावना चमकते. पत्र उचलून खिशांत घालण्याचा ती प्रयत्न करीत असतां भीमराव बॅग घेऊन येतो. तारामती पत्र एका पुस्तकाखालीं ठेवून चटकन् बाजूला होते.]

**भीमराव :** चलावं बाईसाहेब.

[दोघेंजण समोरील दिवाणखान्यांत जातात. भीमराव परत येऊन दिवाणखान्याचें दार लावतो आणि बाहेर जातो. उजवीकडील दरवाजांतून रावबहादुर आणि सदानंद प्रवेश करतात.]

**सदानंद :** बाबासाहेब, लग्न करायला माझा काडीमात्र विरोध नाहीं. उलट माझं असं ठाम मत आहे कीं प्रत्येक माणसानें आपल्या आयुष्यांत एकदा तरी लग्न केलंच पाहिजे ! स्त्रियांसंबंधीं पुरुषाला जो जन्मजात व अकारण मोह वाटतो तो कमी करण्याचा एकमेव माग म्हणजे लग्न. तेव्हां लग्न करायला माझी हरकत नाहीं. मुलीची निवड तुम्हीं करायची कीं मीं करायची हाच एक मतभेदाचा प्रश्न आहे. सध्याच्या लोकशाहीच्या काळामध्यें ...

**रावबहादुर :** लोकशाही ! लोकशाही म्हणजे मूर्खांचीं मतं आणि भामट्यांचा कारभार ! लोकशाहीचे पाठ कृपा करून मला देऊं नका. तुम्ही स्वतः होऊन मुलीची निवड कराल ह्या विश्वासावर मीं आठ वर्षं काढलीं. पण मुलीचा पत्ता नाहीं नि लग्नाचाही पत्ता नाहीं ! आतां हें बस् झालं ! आतां मुलीची निवड मी करणार ! आपले हक्क बजावण्यास लोक नालायक ठरल्यावर लोकशाही बरखास्तच केली पाहिजे. घ्या तो कोट इकडे !

**सदानंद :** टॅक्सी बोलवायला...

**रावबहादुर :** तें माझं मी पाहातों. माझा नोकर बरोबर आहे. मुंबईमधल्या रस्त्यांत आणि राजकारणांत माझी सारी हयात गेली आहे. मी उद्यांपर्यंत तुम्हांला मुदत देतों. तोंपर्यंत तुम्ही कांहीं निर्णय करूं शकलां नाहीं तर मी सांगेन त्या मुलीबरोबर, मी सांगेन त्या मुहूर्तावर, मी सांगेन त्या स्थळीं तुम्हांला बोहल्यावर चढावं लागेल ! [दोघे बाहेर जातात.]

[सदानंद क्षणभरांत विश्रामसह परत येतो.]

**विश्राम :** सदानंद, तूं घरांत नाहींस म्हणून तुझ्या नोकरानें मला सांगितलं. माझं नशीब कीं मी परत जायला निघतांच तूं बाहेर आलास !

**सदानंद :** त्याचं असं आहे विश्राम, आज मी फार फार कामांत आहें. म्हणून मींच भीमरावाला सांगितलं होतं, कीं प्रत्यक्ष परमेश्वर दाराशीं येऊन उभा राहिला तरी त्याला सांग मी घरांत नाहीं म्हणून. एरव्हीं मी मोठा पितृभक्त आहें, पण आज बापाला बाप म्हणायला सुद्धा कबूल नव्हतों मी.

**विश्रांम :** परंतु तूं मित्राला मित्र म्हटलं पाहिजेस. सदानंद, तुझ्या स्नेहाची मला फार आवश्यकता आहे. तुफानी वादळानें एखादा वृक्ष उन्मळून पडावा त्याप्रमाणें उद्यां सकाळचीं वृत्तपत्रें प्रसिद्ध होतांच माझं सामाजिक जीवन कोलमडून पडेल, उध्वस्त होईल. फक्त तुझ्याच स्नेहाचा आधार मला शिल्लक राहील. आणि माझं वैयक्तिक जीवन, माझा संसार—आतां तोही नष्ट झाला आहे. सौदामिनीला सारं कांहीं समजलं.

**सदानंद :** होय, मला माहीत आहे तें !

**विश्राम :** [आश्चर्यानें] तुला माहीत आहे ?

**सदानंद :** माहीत आहे म्हणजे माहीत आहे असं नाहीं. मीं तसा तर्क केला. तुला पाहिल्याबरोबर मी तें ओळखूं शकलों. कुणीं सांगितलं तें सौदामिनीताईना ?

**विश्राम :** [ खुर्चीवर बसत ] स्वतः तारामतीनेंच सांगितलं ! सरकारी दप्तरांतील माहितीची विक्री करून मीं माझ्या राजकीय जीवनाला सुरुवात केली, माझ्या वैभवाचं श्वेतकमल किळसवाण्या कर्दमांत फुललेलं आहे हें तारामतीनेंच सौदामिनीला सांगितलं. श्वेतकमल ! कर्दमांत उमललेलीं कमलं देवाच्या पूजेला सुद्धा चालतात...

**सदानंद :** देव माणसाच्या मानानें अधिक पाषाणहृदयी असले तरी अधिक सहृदय असतात !

**विश्राम :** पण सौदामिनीनें माझ्या जीवनाचा, माझ्या प्रेमाचा धिक्कार केला ! ज्या एकाच स्त्रीला माझ्या अंतःकरणांत जागा आहे, ज्या एकाच स्त्रीच्या श्वासानें माझं जीवन सुगंधित झाल्यासारखं मला वाटत होतं, ज्या एकाच स्त्रीच्या प्रोत्साहनानं माझ्या महत्त्वाकांक्षेला अजिंक्य सामर्थ्य प्राप्त झालं होतं तिच्या प्रेमाला मी सर्वस्वी पारखा झालों ! आतां जीवितांत जिवन्तपणा राहिला नाहीं, जगण्यासारखं कांहीं जवळ उरलं नाहीं !

[ दोन्ही हातांनीं तोंड झाकून घेतो. ]

**सदानंद :** [ क्षणभर थांबून ] बेळगांवहून तुझ्या तारेला कांहीं उत्तर आलं नाहीं का ?

**विश्राम :** [ वरतीं पाहात ] होय, उत्तर आलं आहे. पण आपल्याला उपयोगी पडण्यासारखं त्यांत कांहींच नाहीं. तिकडील वरिष्ठ समाजांत ती बरीच लोकप्रिय आहे आणि सर विश्वनाथांनीं आपली बरीचशी दौलत मरतेवेळीं

तिलाच देऊन टाकली इतकीच महत्त्वाची माहिती आहे त्यांत. सदानंद, कोरड पडली आहे माझ्या घशाला. कांहीं तरी मागवतोस का ?

**सदानंद :** जरूर ! [ बेल दाबतो. ]

**विश्राम :** काय करावं हें मला कळेनासं झालं आहे सदानंद. सकाळीं तूं म्हणालास, तुझा विजय झाला अशी तुझी कल्पना आहे. खरं होतं तें. मी विजयी झालों ही माझी केवळ कल्पनाच होती. माझा पराभव झाला. वैऱ्याचाही होऊं नये असा माझा पराभव झाला !

[ भीमराव प्रवेश करतो. ]

**सदानंद :** भीमराव, सरबत घेऊन ये लवकर.

**भीमराव :** होय साहेब. [ जाऊं लागतो. ]

**सदानंद :** आणि हें पाहा भीमराव... [ उठून बाजूला जातो. ]

**भीमराव :** [ थांबून ] जी साहेब.

**सदानंद :** [ हलक्या आवाजांत ] भीमराव, त्या बाई—मघाशीं सांगितलं त्या—आतां जर आल्या तर त्यांना सांग मी घरीं नाहीं म्हणून. कांहीं फार जरूरीच्या कामासाठीं मला बाहेर जावं लागलं असं ...

**भीमराव :** साहेब, त्या बाई मघाशींच आल्या. ह्या दिवाणखान्यांत आपल्या सांगण्यानुसार बसवलं आहे त्यांना.

**सदानंद :** [ अगतिकपणानें ] ठीक केलंस ! [ भीमराव जातो. ] सौदामिनीताई आंत येऊन बसल्या ! आतां ह्या घोटाळ्याला मर्यादा राहिली नाहीं. रथाचं चाक पृथ्वीनें गिळलं आहे, अर्जुन बाणांचा वर्षाव करतो आहे आणि भगवान् श्रीकृष्ण शिव्यांची लाखोली वाहात आहेत. बिचाऱ्या कर्णाची अवस्था काय झाली असेल हें मी आतां चांगलं जाणूं शकतों ! ठीक आहे, ह्यांतूनही मार्ग काढला पाहिजे.

[ जागेवर येऊन बसतो. ]

**विश्राम :** मी काय करूं सदानंद ? शीड तुटून वादळांत सापडलेल्या नौकेसारखी माझी अवस्था झाली आहे. आकाशांत एकही तारा दिसत नाहीं, किनाऱ्यावर एकही दिवा दिसत नाहीं ! सर्वस्व गिळूं पाहाणाऱ्या अक्राळ विक्राळ लाटा आणि अंधार !

**सदानंद :** विश्राम, सौदामिनीवर तुझं अतिशय प्रेम आहे, नाहीं ?

**विश्राम :** सौदामिनी ही माझ्या जीवनाची स्वामिनी आहे! दुसरी कोणतीही गोष्ट तिच्याइतकी मला प्रिय नाहीं. मला केव्हां केव्हां वाटत असे, कीं पुरुषाला प्रेमापेक्षां महत्त्वाकांक्षेचं महत्त्व अधिक आहे, पुरुषाच्या जीवनाची प्रेरणा प्रेमांत नसून महत्त्वाकांक्षेंत आहे, स्त्रीच्या हृदयांत नसून स्वतःच्या मनगटांत आहे. पण तें चूक होतं. महत्त्वाकांक्षेवांचून मनुष्य फार तर मोठा होऊं शकणार नाहीं पण प्रेमावांचून त्याचं जीवनच अशक्य होईल. माझं जीवन आज अशक्य झालेलं आहे.

**सदानंद :** ज्याच्या हातून केव्हां ना केव्हां अपराध घडला आहे, पाप घडलं आहे, तो इतरांचे अपराध अक्षम्य समजूं शकत नाहीं. सौदामिनीताईंच्या जीवनांत असं कांहींच नाहीं का ?

**विश्राम :** मुळींच नाहीं! तिच्या जीवनाचा सारा प्रवाह निर्मळ आणि विशुद्ध आहे. मोह आणि दुर्बलता म्हणजे काय हें सौदामिनीला ठाऊक नाहीं. व्यवहाराच्या पातळीहून खूप उंचावर असलेल्या आसनावर आरूढ झालेली शुद्ध स्फटिकाची मूर्ति आहे ती. तिच्या कठोरपणाचा उगम सुद्धा ह्या विशुद्धतेंतच आहे. होय, सौदामिनी कठोर आहे, फार कठोर आहे आणि तरी सुद्धा ती मला सर्वस्वाहून प्रिय वाटते. मी आज तिच्याशीं संतापानें बोललों. पण गुन्हेगारांना साधूंच्या समोर वाटणारा संताप होता तो! माझ्या स्वार्थी अशुद्ध भावनेचा जळफळाट होता तो!

**सदानंद :** विश्राम, माझी कल्पना आहे, सौदामिनीताई तुला क्षमा करतील. कदाचित् अगदीं ह्या क्षणाला त्या तुला क्षमा करीत असतील!

[भीमराव सरबत घेऊन येतो.]

**सदानंद :** विश्राम, तुझी गाडी आणली आहेस तूं ?

**विश्राम :** नाहीं.

**सदानंद :** मग माझी गाडी घेऊन जा तूं. भीमराव, गाडी बाहेर घ्यायला सांग.

**भीमराव :** होय साहेब. [जातो.]

**सदानंद :** विश्राम, माफ कर, परंतु आत्तां मला फार महत्त्वाचं काम आहे.

**विश्राम :** तुझा फार वेळ घेत नाहीं मी सदानंद. आणखी एक महत्त्वाची गोष्ट तुला सांगायची आहे. आज रात्रीं मंत्रिमंडळाची बैठक भरणरा आहे...... [दिवाणखान्यांत कांहीं तरी पडल्याचा आवाज होतो.] कसला आवाज झाला ?

**सदानंद :** कांहीं विशेष नसेल...

**विश्राम :** ह्या दिवाणखान्यांत आवाज झाला कसला तरी! कुणी तरी ऐकतं आहे तिकडून.

**सदानंद :** छे छे, कुणी नाहीं तिकडे.

**विश्राम :** कुणी तरी आहे ह्यांत शंका नाहीं. दिवाणखान्याचं दार अर्धवट उघडं आहे आणि आंतले दिवेही लावलेले आहेत ! मीं उच्चारलेला प्रत्येक शब्द कुणींतरी त्या खोलींतून ऐकला! सदानंद, ह्याचा अर्थ काय ?

**सदानंद :** विश्राम, उगाच गैरसमज करून घेतो आहेस तूं ! मी सांगतों, त्या खोलींत कुणीही नाहीं.

**विश्राम :** तुझ्या शब्दावर विश्वास ठेवूं मी ? तूं अगदीं खरं बोलतो आहेस सदानंद ?

**सदानंद :** ह्यांतलं एक अक्षरही खोटं नाहीं. कुणी सुद्धा नाहीं तिकडे!

**विश्राम :** मी स्वतः बघतों. [ उठूं लागतो. ]

**सदानंद :** छे छे!

**विश्राम :** कुणी नाहीं तर बघायला काय हरकत आहे सदानंद?

**सदानंद :** असा आततायीपणा करूं नकोस विश्राम. माझ्या शब्दावर विश्वास ठेव.

**विश्राम :** तुझ्या शब्दावर माझा विश्वास आहे. पण माझ्या मनाचं मी समाधान करून घेतलं तर तुझी हरकत कां असावी ? माझी मनःस्थिति लक्षांत घे सदानंद. माझ्या जीवनांतील भयंकर रहस्यांचा उच्चार मीं इथें केला ...

**सदानंद :** विश्राम, कुणी नाहीं म्हणून मी सांगतों आहें आणि तें पुरेसं आहे.

**विश्राम :** पुरेसं नाहीं तें! [ उठून दरवाजाकडे जाऊं लागतो. ] मी आंत जाऊन बघितल्याशिवाय, माझी स्वतःची खात्री करून घेतल्याशिवाय राहाणार नाहीं!

**सदानंद :** विश्राम, पुढें जाऊं नकोस! कुणी तरी दिवाणखान्यांत आहे हें खरं आहे!

**विश्राम :** मला वाटलंच !

**सदानंद :** विश्राम, खोलींत जाशील तर ...

**विश्राम :** दूर हो! माझ्या जीवनाचं रहस्य कुणाला कळलं हें समजून घेण्याचा मला हक्क आहे. माझ्या सर्वस्वाचा प्रश्न आहे हा!

[ दिवाणखान्यांत जातो. ]

**सदानंद** : [ खुर्चीवर कोलमडतो. ] सौदामिनीला इथें, ह्या वेळीं आणि अशी लपलेली पाहून काय वाटेल विश्रामला !

[ विश्राम बाहेर येतो. त्याच्या दृष्टींत संताप आणि तिरस्कार भरलेला आहे. ]

**विश्राम** : माझं जीवन उध्वस्त करून ही स्त्री तुझ्या आश्रयाला आली ! तिला तूं माझ्यापासून लपवीत होतास !

**सदानंद** : विश्राम, मी शपथपूर्वक सांगतों तिला लपविण्याचा प्रयत्न मीं केला नाहीं, लपविण्यासारखं ह्यांत कांहींही नाहीं !

**विश्राम** : बेशरम, निर्लज्ज स्त्री !

**सदानंद** : असं बोलूं नकोस विश्राम. माझ्यावर विश्वास ठेव. तुझ्यासाठीं, तुला वांचविण्यासाठींच ती इथें आली आहे. तुझ्यावर, केवळ तुझ्यावरच तिचं अढळ प्रेम आहे विश्राम !

**विश्राम** : तिचं माझ्यावर प्रेम ! तिच्या प्रेमामुळें तुझं डोकं ठिकाणावर राहिलं नाहीं सदानंद. तुमच्या भानगडींशीं मला काय करायचंय् ? खुशाल ती तुझ्या घरांत कायमची राहूं दे. तुम्ही दोघं एकमेकांना लायक आहांत ! ती एक कुटिल, कारस्थानी, बेशरम स्त्री आणि तूं मित्राचा द्रोह करणारा, ज्यानें विश्वासानें तुझ्यापुढें अंतःकरण खुलं केलं त्याच्या काळजांत कट्यार मारूं पाहाणारा नरराक्षस ... [ जाऊं लागतो. ]

**सदानंद** : हें सारं साफ खोटं आहे, विश्राम ! थांब तिच्यासमक्षच ... [ दिवाणखान्याकडे धावतो. ]

**विश्राम** : आतां कांहीं तसदी घेऊं नकोस. तुझ्या वाणीनें सत्याचे जितके खून पाडले तितके पुरे आहेत. [ बाहेर निघून जातो. ]

[ दिवाणखान्याचा दरवाजा उघडून तारामती हसत हसत बाहेर येते. ]

**तारामती** : नमस्कार सदानंद !

**सदानंद** : [ आश्चर्यचकित होऊन ] कोण, तारामती ! तारामतीबाई ...

**तारामती** : तारामतीबाई नव्हे, तारामतीच ! खरं म्हणजे, तारामती सुद्धा नव्हे, तर तुम्हीं लिहिलेल्या अनेक प्रेमपत्रांतली प्रिय तारा ! तीच मी.

**सदानंद** : तारामती, काय करीत होतीस तूं इथें ?

**तारामती :** कानांवर पडेल तें ऐकत होतें! चोरून ऐकण्यांत मोठी मौज असते सदानंद.

**सदानंद :** ठीक! तूं इथें आलीस हें एका दृष्टीनें बरंच झालं. तुला चार हिताच्या गोष्टी सांगणं जरूर आहे असं मला वाटतं.

**तारामती :** रात्रीं अकराच्या सुमाराला बायकांना हिताच्या गोष्टींपेक्षां अहिताच्या गोष्टीच अधिक आवडतात!

**सदानंद :** तारामती, पूर्वीसारखीच आहेस तूं अजून!

**तारामती :** भलतंच! माझ्यांत खूप खूप सुधारणा झाली आहे. किती तरी नवीन अनुभव मिळाले मला!

**सदानंद :** अनुभव येऊन कधीं माणसाची सुधारणा होत नाहीं तारामती. त्याचा मूर्खपणा मात्र अधिक रुजत जातो. पण तूं कशासाठीं आलीस? विश्रामनें सर विश्वनाथांना पाठवलेलं पत्र मला विकण्यासाठीं?

**तारामती :** कसं ओळखलंत?

**सदानंद :** तुला मी ओळखतों म्हणून. आणलं आहेस तें पत्र?

**तारामती :** नाहीं, आणलेलं नाहीं; पण आणतां येईल.

**सदानंद :** किती रक्कम हवी आहे तुला त्यासाठीं?

**तारामती :** रक्कम! बंद असलेला प्रत्येक दरवाजा सोन्याच्या किल्लीनें उघडतां येईल ही कल्पना वेडेपणाची आहे! सदानंद, आज मी श्रीमंत आहें. तुमच्याइतकीच किंबहुना तुमच्याहूनही अधिक श्रीमंत आहें. मला पूर्वी पैशांची आवश्यकता होती, आज नाहीं.

**सदानंद :** मग काय हवंय् तुला?

**तारामती :** काय हवंय्! ... तुम्हांला ओळखतां येत नाहीं?

**सदानंद :** नाहीं.

**तारामती :** आणि म्हणे मी तुला ओळखतों.

**सदानंद :** तें खरं आहे, पण तुझ्यांत खूप खूप सुधारणा झाली आहे ना तारामती?

**तारामती :** तारामती कां म्हणतां मला? दोन अक्षरं कमी केलीं तर काय हरकत आहे? पूर्वी ताराच म्हणत होतां तुम्ही मला!

**सदानंद :** पूर्वी अनेक गोष्टी करीत होतों मी. पण काय उपयोग ? इतिहासाची पुनरावृत्ति होत नाहीं !

**तारामती :** [ स्वप्नाळूपणानें ] सदानंद, तुम्ही एकदा माझ्यावर प्रेम करीत होतां ...

**सदानंद :** होय.

**तारामती :** आणि ... आणि आपलं लग्नही व्हायचं ठरलं होतं.

**सदानंद :** होय. प्रेमानें मनुष्य आंधळा होतो.

**तारामती :** तुम्हांला माझ्याबद्दल कांहीं संशय आला आणि तुम्हीं लग्नाचा विचार रद्द केलात.

**सदानंद :** आणि तूं सुद्धा ... माझ्याकडून बरेचसे पैसे घेऊन !

**तारामती :** तेव्हां मी दरिद्री होतें. प्रेमापेक्षां पैशांचं महत्त्व तेव्हां मला जास्त वाटत होतं. सदानंद, तुम्हांला दारिद्र्याचा अनुभव नाहीं ...

**सदानंद :** होय, अनेक लोक ही गोष्ट मला वारंवार बजावून सांगतात. पण माझा नाइलाज आहे त्याला.

**तारामती :** सदानंद, तुम्हांला आलेला संशय थोडासा खरा असला तरी बराचसा खोटा होता. मी कशीही वागलें असलें तरी—तरी माझं प्रेम तुमच्यावरच होतं !

**सदानंद :** हें किती लोकांना सांगितलं आहेस आजवर ?

**तारामती :** [ त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ] माझं प्रेम तुमच्यावरच होतं आणि सदानंद, माझं प्रेम आजही तुमच्यावरच आहे. काल रात्रीं विश्रामच्या घरीं तुम्हांला पाहिल्यावर मला कळून चुकलं कीं तुमच्यावरच— फक्त तुमच्यावरच मी प्रेम करूं शकेन.

[ हात त्याच्या हातावर ठेवते. ]

**सदानंद :** पुन्हा मी असा हातोहात फसला जाईन अशी तुझी कल्पना असेल तर ती चूक आहे तारामती.

[ हात बाजूला घेतो. ]

**तारामती :** माझ्या एकाकी जीवनाचा मला आतां कंटाळा आला आहे सदानंद. माझं जीवन म्हणजे सुरुवातीपासून एक लढाई होती. ह्या लढाईंत स्वतःच्या सामर्थ्यानें मीं जय मिळवला.

**सदानंद** : गड आला पण सिंह गेला ! तूं विजय मिळवलास पण तुझं स्त्रीत्व कामाला आलं !

**तारामती** : होय, हा विजय मिळवतांना सुद्धा माझं स्त्रीत्वच कामाला आलं. मीं विजय मिळवला, आतां मला विश्रांति हवी आहे. नावाडी कितीही साहसी असला, खवळलेल्या समुद्राशीं झुंज देताना तो कितीही बेहोष होत असला तरी केव्हां ना केव्हां जहाज किनाऱ्याला लावण्याची, विसांवा घेण्याची त्यालाही आवश्यकता वाटते. सदानंद, स्त्रीत्व कितीही दडपलं तरी तें दडपलं जात नाहीं. जीवनाचा प्रवाह भोवतालीं उसळत असतांना, कुणाच्या तरी आश्रयानें, कुणाच्या तरी बाहुपाशांत बेहोषपणें पडून राहावं असं त्याला वाटतं ! सदानंद, मीं तुमच्यावर प्रेम केलं आहे, करतें आहे आणि तुम्हींही एकदा माझ्यावर प्रेम केलं आहे ! ज्या स्त्रीवर एकदा प्रेम केलेलं आहे...

**सदानंद** : तिच्यावर पुन्हा कधींही प्रेम करतां येणं शक्य नसतं !

**तारामती** : माझ्यावर प्रेम करा असा मी आग्रह करीत नाहीं...

**सदानंद** : फक्त लग्न करा इतकीच मागणी आहे तुझी !

**तारामती** : होय, माझ्याशीं तुम्हीं लग्न करावं इतकीच इच्छा आहे माझी.

**सदानंद** : आणि त्या पत्राचं काय झालं ?

**तारामती** : माझा हार तुमच्या गळ्यांत पडतांच तें पत्रही तुमच्या हातांत ठेवीन मी !

**सदानंद** : अस्सं. विश्रामचा गळा सोडवण्यासाठीं माझा गळा मी गुंतवून घेऊं म्हणतेस !

**तारामती** : शब्दांचं मला महत्त्व वाटत नाहीं. तुम्ही तसंही म्हणूं शकतां ! लग्नाचं वचन द्याल तर आत्तां सुद्धा तें पत्र तुमच्या हवालीं करायला मी तयार आहें.

**सदानंद** : आत्तां ?

**तारामती** : [हसून] उद्यां सकाळीं !

**सदानंद** : माझ्या कुंडलींतले सारे ग्रह मात्र लग्नाच्या घरांत उपस्थित झालेले दिसतात. तारामती, तूं हें सारं गंभीरपणें बोलते आहेस ?

**तारामती** : हो, अगदीं गंभीरपणें !

**सदानंद** : चांगला पति होण्यास लागणारे गुण किंवा दुर्गुण माझ्यामध्यें नाहींत हें तुला ठाऊक आहे.

**तारामती** : मला फक्त चांगला संसार, चांगलं घर हवं आहे.

**सदानंद** : [उठून] तें मी ओळखतों तारामती. तुला फक्त घर हवं आहे. रावबहादुरांच्या घराण्याची प्रतिष्ठा हवी आहे! लग्नानें समाजांत प्रतिष्ठा मिळत नसती तर ह्या आडमार्गाला तूं कधीं वळली नसतीस. तुझ्या महत्त्वाकांक्षेची ही आणखी एक भूक आहे इतकंच. तिच्या पूर्ततेसाठींच हें प्रेमाचं मंजुळ कूजन तुला करावं लागत आहे.

**तारामती** : इच्छा नसेल तर प्रेमाचं मंजुळ कूजन तुम्ही ध्यानांत घेऊं नका. मी तुम्हांला विश्रामचं पत्र देतें, तुम्ही माझ्याशीं लग्न करा.

**सदानंद** : तें होणं अशक्य आहे, तारामती.

**तारामती** : मला वाटलं होतं, आपल्या मित्रासाठीं तुम्ही कोणत्याही स्वार्थत्यागाला तयार व्हाल!

**सदानंद** : कुणींही कुणासाठीं स्वार्थत्याग करूं नये असं माझं मत आहे तारामती. जो स्वार्थत्याग करतो त्याचं तर नुकसान होतंच परंतु ज्याच्यासाठीं तो केला जातो त्याचाही अधःपात होतो. मित्रासाठीं स्वार्थत्याग करून मी असा मित्रद्रोह कधीं करणार नाहीं.

**तारामती** : विश्रामच्या बाबतींत तुमची ही भीति अस्थानीं आहे. त्यांचा अधःपात नव्यानें व्हायचा नाहीं. पूर्वींच झाला आहे तो.

**सदानंद** : चुकीची कल्पना आहे ही. अधःपात हा हीन मनोवृत्तीनें होतो, हातून घडणाऱ्या हीन कृत्यानें नव्हे. विश्राम अशा मनोवृत्तीपासून म्हणजे अधःपातापासून फार दूर आहे.

**तारामती** : तुम्ही पुरुष किती परस्परांची तरफदारी करतां!

**सदानंद** : आणि तुम्ही बायका किती एकमेकींना पाण्यांत पाहातां?

**तारामती** : मी फक्त एकाच स्त्रीला पाण्यांत पाहातें आणि ती म्हणजे सौदामिनी! सौदामिनीचा मी द्वेष करतें, फार पूर्वींपासून करतें...ठीक आहे, माझं म्हणणं तुम्हांला पटत नाहीं. सौदामिनीचा सूड घेण्याच्या माझ्या महत्त्वाकांक्षेचा तुमच्यासाठीं मी त्याग करायला तयार होतें. माझ्या जीवनांतील आणखी एका मोठ्या विजयावर मी तुमच्यासाठीं पाणी सोडायला तयार होतें पण तुमची तशी इच्छा नाहीं.

उद्यां सकाळीं विश्रामचं पाप जगाच्या वेशीवर टांगलं जाईल! ठीक, जातें मी. नमस्कार! ...... माझा नमस्कार सुद्धा घ्यायचा नाहीं वाटतं!

**सदानंद :** तुझा नमस्कार सुद्धा घेऊं शकत नाहीं मी. खरं आहे तें. विश्रामशीं तुझं होत असलेलं वर्तन मी समजूं शकतों तारामती. ज्या काळांत तूं जन्माला आली आहेस त्यांत तें खपून जाण्यासारखं आहे. परंतु सौदामिनीशीं तूं केलेलं वर्तन मात्र तिरस्करणीय, अगदीं राक्षसी आहे. आज तिच्या घरीं जाऊन तूं तिच्या संसाराला आग लावलीस, हातोड्याचे घाव घालून तिच्या अंतःकरणांतील मूर्तीचे तुकडे केलेस ...

**तारामती :** सदानंद, तुम्ही माझ्यावर अन्याय करीत आहांत. मीं अशा कोणत्याही हेतूनें सौदामिनीच्या घरीं गेलें नव्हतें. तिच्या अभिमानामुळें, गर्विष्ठपणामुळें पुढचा सारा प्रकार घडून आला. माझ्या हरवलेल्या आंगठीचा शोध करण्यासाठींच मी तिच्याकडे गेलें होतें.

**सदानंद :** हरवलेल्या आंगठीचा ?

**तारामती :** होय, खुद्द सौदामिनीही हें कबूल करील.

**सदानंद :** सर्पाच्या आकृतीची आणि फण्यांत हिरा असलेली आंगठी ?

**तारामती :** हो, तीच. तुम्हांला काय ठाऊक ?

**सदानंद :** कारण ती आंगठी सापडली आणि मलाच सापडली. हीच ना ती ?

[ उठतो आणि ड्रॉअरमधून आंगठी काढतो. ]

**तारामती :** होय, हीच. फार आभारी आहें मी तुमची, सदानंद. [ बोट पुढें करते. ]

**सदानंद :** आभार मानण्याचं कारण नाहीं, कारण ही आंगठी परत द्यायचा विचार नाहीं माझा.

**तारामती :** [ हसून ] माझी आठवण म्हणून जवळ ठेवणार ?

**सदानंद :** जवळ ठेवण्यासाठीं नव्हे. कोर्टांत हजर करण्यासाठीं !

**तारामती :** [ दचकते. ] म्हणजे ?

**सदानंद :** ही आंगठी तूं चोरलेली आहेस, तारामती.

**तारामती :** [ संतापून ] सदानंद, तुम्हांला शरम वाटायला हवी असं बोलतांना !

**सदानंद :** चोरावर चोरीचा आरोप करतांना कुणालाही शरम वाटण्याचं कारण नाहीं तारामती. अनेक वर्षांपूर्वीची गोष्ट असल्यानें तुझ्या कदाचित् स्मरणांत

नसेल, पण माझ्या आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं ही आंगठी माझ्या चुलत बहिणीला मीं स्वतः लग्नाच्या वेळीं भेट म्हणून दिली होती. तिच्यासाठीं मुद्दाम करवून घेतली होती ही आणि तुला माहीत नसेल पण ह्या खड्याच्या खालीं तिचं नांवही कोरलेलं आहे. त्या लग्नाला तूं हजर होतीस आणि ही आंगठी लग्न झाल्याबरोबर चोरीला गेली. नेहमींप्रमाणें एका नोकरावर आळ आला, परंतु पुरावा मिळाला नाहीं. म्हणूनच आंगठी सापडतांच चोर शोधण्यासाठीं मीं ती जवळ ठेवली. आतां चोर सापडला.

**तारामती** : [ भेसूर चेहऱ्यानें ] साफ खोटं आहे सारं !

**सदानंद** : म्हणजे ? खोटं ठरवतां येईल अशी तुझी कल्पना असेल तर ती साफ चूक आहे ! ही आंगठी तुझ्या ताब्यांत होती ह्याचे हजार पुरावे उभे राहातील. ही आंगठी लपण्यासारखी नाहीं. आज सौदामिनीकडे तूं आंगठीचा शोध करायलाच गेली होतीस आणि चारचौघांसमोर तूं तिचं वर्णनही केलं असणार. तारामती, ही आंगठी फार मूल्यवान् आहे. पोलीसांनीं अद्याप तिचा तपास थांबवलेला नाहीं.

**तारामती** : [ भयभीत होऊन ] तुम्ही काय करणार, काय करणार सदानंद ?

**सदानंद** : मी एक साधी गोष्ट करणार. बेल वाजवून भीमरावला बोलावणार. फार चांगला नोकर आहे तो. आला कीं पोलीस अधिकाऱ्यांना ताबडतोब बोलवायला त्याला सांगणार !

**तारामती** : पोलीस !

**सदानंद** : होय, प्रथम पोलीस, नंतर कोर्ट, नंतर तुरुंग ! तुझ्या विजयी, महत्त्वाकांक्षी जीवनाचा काय हा भयंकर शेवट !

**तारामती** : [ थरकांपत ] दुष्ट, चांडाळ, नीच...

**सदानंद** : तुझ्याप्रमाणें माझा सुद्धा शब्दांवर व शिव्यांवर विश्वास नाहीं तारामती. भीमरावला बोलावतों मी.

[ हात बेलकडे नेतो. ]

**तारामती** : [ आवेशानें त्याचा हात पकडीत ] नका, सदानंद, नका ! मी तुमचं वाटेल तें ऐकायला तयार आहें, तुम्हांला वाटेल तें द्यायला कबूल आहें !

**सदानंद** : विश्रामचं पत्र ?

**तारामती :** विश्रामचं पत्र ? सदानंद, मला विचार करायला थोडा अवधि द्या.

**सदानंद :** [ हात पुढें करून ] विश्रामचं पत्र !

**तारामती :** आतां माझ्याजवळ नाहीं आहे तें. उद्यां देईन मी.

**सदानंद :** तारामती, तूं खोटं बोलते आहेस. पत्र तुझ्याजवळ आहे आणि तें मला आत्तां मिळालं पाहिजे ! [ तारामती खिशांतून पत्र काढून देते. ] हेंच तें ?

[ पत्रावर नजर टाकतो. ]

**तारामती :** [ उद्वेगानें ] होय.

[ सदानंद काडी ओढतो आणि पत्र जाळून टाकतो. ]

**सदानंद :** विश्रामचा मार्ग आतां निर्वेध झाला.

**तारामती :** [ टेबलावरील पुस्तकाखालीं असलेल्या पत्राकडे नजर जाते. ] मला थोडंसं पाणी द्याल ?

**सदानंद :** जरूर.

[ उठतो आणि कोपऱ्यांत असलेल्या खुजांतून पाणी आणतो. त्याची पाठ वळतांच तारामती झटकन् उठून पुस्तकाखालील सौदामिनीचें पत्र घेते व खिशांत घालते. ]

**तारामती :** [ घोटभर पाणी पिऊन उठते. ] जातें मी आतां सदानंद. तुमचा मित्र संकटमुक्त झाल्याबद्दल तुम्हांला समाधान वाटत असेल नाहीं ?

**सदानंद :** निदान वाटायला हवं.

**तारामती :** तुमची मैत्रीण संकटांत सापडल्याबद्दल दुःखही वाटणं आतां जरूर आहे तुम्हांला.

**सदानंद :** म्हणजे ?

**तारामती :** सौदामिनीचा सूड घेण्याची, तिचा संसार उध्वस्त करण्याची महत्त्वाकांक्षा मी अद्यापही पुरी करूं शकतें. विश्रामनीं तुम्हांला मघाशीं मित्रद्रोही ठरवलं, पण तुमचा मित्रद्रोह कुठल्या थराला गेला आहे ह्याची कल्पना नाहीं त्यांना ! विश्रामसारख्या जिवलग मित्राच्या पत्नीशीं . . .

**सदानंद :** तारामती ! काय बोलते आहेस तूं हें ?

**तारामती :** चोरावर चोरीचा आरोप करायला कांहींच हरकत नसते. तुमच्या ह्या मित्रद्रोहाचा पुरावा — सौदामिनीचें प्रेमपत्र — ह्या क्षणाला माझ्या खिशांत आहे. [ हसत ] " तुमची मला फार फार जरूरी आहे, मी तुमच्याकडे येत आहें ! "

[ सदानंद टेबलाकडे धावतो आणि पत्र शोधतो.
मोकळा लिफाफा मात्र त्याला सापडतो. ]

**सदानंद :** तारामती, तें पत्र मुकाट्यानें माझ्या स्वाधीन कर. तें परत केल्याशिवाय तुला इथून जातां येणार नाहीं, मी जाऊं देणार नाहीं. नीट दिलं नाहींस तर बळजबरीनें घ्यावं लागेल मला.

[ तो तिच्याकडे जातो. तो जवळ येण्यापूर्वीच ती
बेल जोरानें दाबते...दाबीत राहाते. बेलचा कर्कश
आवाज ऐकूं येतो. भीमराव प्रवेश करतो. ]

**तारामती :** [ क्षणभर थांबून. ] मला बाहेर पोचवण्यासाठीं बेल वाजवली सदानंदांनीं. नमस्कार, सदानंद !

[ दारांतून बाहेर जाते. मागोमाग भीमराव जातो.
जातांना विजयी दृष्टीनें ती एकदा मागें वळून
पाहाते. सदानंद शून्यमनस्क होऊन पाईप पेटवतो. ]

# ४

[ विश्रामचें घर. दिवाणखाना. सकाळची वेळ. ]

[ सदानंद प्रवेश करतो. ]

**सदानंद :** ह्या घरांतलीं सारीं माणसं आज गेलीं तरी कुठें? बोलायचं आहे पण बोलायला माणूस नाहीं! एखाद्या दैनिकाच्या जादा अंकाप्रमाणें मी प्रक्षोभक बातम्यांनीं आकंठ भरून गेलों आहे, परंतु हें भांडार मोकळं करायचं कुणाजवळ? दैनिकाच्या जादा अंकाचं भांडवल आहे, पण अवस्था मात्र झाली आहे उच्च दर्जाचं साहित्य पुरविणाऱ्या मासिकासारखी!

[ महादेव प्रवेश करतो. ]

**महादेव :** विश्रामसाहेब यायला अजून थोडा अवकाश आहे साहेब. ऑफिसमध्यें आहेत ते.

**सदानंद :** सौदामिनीताईही अजून बाहेर आल्या नाहींत का?

**महादेव :** नाहीं, पुष्पाताई मात्र बाहेरून आतांच परत आल्या आहेत.

**सदानंद :** काळ्याकुट्ट ढगाला एक तरी रुपेरी कड आहे एकूण.

**महादेव :** रावबहादुरही दिवाणखान्यांत आलेले आहेत. तुम्ही इकडे आलां असल्याचं कळवलंय् मी त्यांना.

**सदानंद :** शाबास ! आतां पुन्हा दिवाणखान्यांत गेलास म्हणजे मी इकडे नाहीं असं त्यांना सांग.

**महादेव :** ठीक आहे साहेब.

[जातो.]

**सदानंद :** बापाला देवासारखं मानावं हें मला एकदम मान्य आहे पण त्यासाठीं त्यांनीं आपल्या मुलांपासून दूर आणि अदृश्य राहाणं जरूर आहे. पितापुत्रांच्या भेटी अशा वारंवार होऊं लागल्या तर पितृभक्तीला ओहटी लागण्याचा संभव असतो. बाबासाहेबांची भेट या वेळीं न होणंच इष्ट आहे. [बसतो.]

[रावबहादुर प्रवेश करतात.]

**रावबहादुर :** विश्रामला भेटायला आलों तर तुम्ही इकडे आलां आहांत असं समजलं. आपल्याप्रमाणें दुसऱ्यांच्याही वेळेची किंमत तुम्हांला दिसत नाहीं !

**सदानंद :** [उठून वर्तमानपत्र दूर ठेवतो.] ह्या बाबतींत मी आपला आणि दुसऱ्याचा हा भेदभाव मानीत नाहीं. शिवाय वेळेची किंमत माझ्या दृष्टीनें फार मर्यादित आहे. माणूस आणि घड्याळ ह्यांच्यांतील अंतर, माणूस जमिनीवर असतो आणि घड्याळ भिंतीवर असतं इतकंच नाहीं तर माणसानं आपलं घड्याळ होऊं देतां कामा नये.

**रावबहादुर :** माणसं म्हणजे घड्याळं असतीं तर एखाद्या घड्याळजीकडून तुम्हांला अर्ध्या घटकेंतच दुरुस्त करून घेतलं असतं. पण जाऊं द्या. नसलेल्या गोष्टीचा शोक कशाला ? मीं रात्रीं सांगितलेल्या गोष्टीचा विचार केला का ?

**सदानंद :** तेव्हांपासून त्याच गोष्टीचा सारखा विचार करतों आहें.

**रावबहादुर :** मग ठरवलंत लग्नाचं ?

**सदानंद :** अजून नाहीं ! परंतु दुपारपर्यंत ठरवीन म्हणतों.

**रावबहादुर :** मी तुम्हांला उद्यां सकाळपर्यंत वेळ देतों.

**सदानंद :** मग तर सोन्याहून पिवळं झालं ! उद्यांपर्यंत एकच काय पण अनेक लग्नं ठरवितां येतील.

**रावबहादुर :** लागलांत पुन्हा मूळपदावर यायला ! आजचा दैनिक भारत पाहिलात का ?

**सदानंद :** अर्थातच नाहीं ! दैनिकं वाचणं मला फारसं आवडत नाहीं. कारण तीं रोज वाचावीं लागतात आणि तीं वाचून जगाविषयीं आणि संपादकांविषयीं निराश व्हावं लागतं. त्यापेक्षां साप्ताहिकांतले किंवा द्विसाप्ताहिकांतले मथळे आणि जाहिराती वाचणं मी अधिक पसंत करतों. जाहिराती वाचून माणसाचा आशावाद आणि उत्साह नेहमीं कायम राहातो.

**रावबहादुर :** लहान प्रश्नांना मोठीं उत्तरं देण्याची ही तुमची पद्धत तुम्हांला नसली तरी श्रोत्यांना फार तापदायक आहे. एकूण भारतांतला अग्रलेख तुम्हीं वाचला नाहींत ?

**सदानंद :** अग्रलेख ! बापरे, मुळींच नाहीं ! तुमची पिढी आणि आमची पिढी ह्यांच्यांतली महत्त्वाची तफावत हीच आहे बाबासाहेब; तुमची पिढी अग्रलेख उघडपणें वाचीत होती आणि जाहिराती चोरून वाचीत होती. आम्ही नव्या मनूचे नवे शिपाई जाहिराती उघडपणें वाचतों आणि अग्रलेख चोरून सुद्धा वाचीत नाहीं. आजच्या पिढीचं नैतिक किंबहुना अनैतिक धैर्य फार वाढलं आहे !

**रावबहादुर :** आज भारतानें विश्रामवर अग्रलेख लिहिला आहे हें तुमच्या कानांवर तरी आलं आहे का ?

**सदानंद :** मुळींच नाहीं. काय म्हणतोय् तो ?

**रावबहादुर :** काय म्हणतोय् ? विश्रामवर तीन कॉलमांतून स्तुतीचा अगदीं वर्षाव केलाय् त्यानें. कालच्या बैठकींत कर्नाटक इंडस्ट्रीज्च्या प्रकरणीं त्यानें केलेलं भाषण थेट सुरेंद्रनाथ बानर्जींच्या वक्तृत्वाची आठवण करून देतें असे उद्गार काढले आहेत त्यांत.

**सदानंद :** सुरेंद्रनाथ बानर्जी कोण हा ? आपला तो प्रसिद्ध बोलर तर नाहीं ? ...पण काय केलं विश्रामनें ? कंपनीला पाठिंबा दिला ?

**रावबहादुर :** पाठिंबा ? आपल्या मित्राबद्दलचं तुमचं अज्ञान किती प्रचंड आहे ! विश्रामनें कंपनीवर कडक टीका केली इतकंच नाहीं तर आजचे भांडवलदार समाजाची कशी नागवणूक करतात ह्याचंही उत्कृष्ट विवेचन केलं. ह्या प्रकरणामुळें विश्रामच्या राजकीय जीवनांत क्रान्ति होण्याचा संभव आहे असंही भारतानें सूचित केलं आहे. एकदा जरूर वाचून पाहा हा अग्रलेख. [ भारताचा अंक उघडून ] ऐका हें...विश्रामपंत देशमुख ... महाराष्ट्राचे एक श्रेष्ठ नेते ... बानर्जी-गोखल्यांच्या

परंपरेंतले वक्ते ... संशयाच्या पलीकडे असलेली शुद्धता ... राजकारणांतील अजिंक्य प्रामाणिकपणा ... मराठी बुद्धिमत्तेचा आणि कर्तबगारीचा प्रतिनिधी! कोणत्याही पत्रकाराची तुमच्यासंबंधीं असं लिहिण्याची छाती होणार नाहीं!

**सदानंद :** त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें फार! विश्रामचं हें सारं वर्णन मात्र अगदीं खरं आहे. ह्याहूनही अधिक प्रशंसेला पात्र आहे तो.

**रावबहादुर :** तुम्ही राजकारणांत पडाल अशी मला मोठी आशा होती.

**सदानंद :** तुमची निराशा केल्याबद्दल मला क्षमा करा बाबासाहेब; पण राजकारणाचा सारा मामला एकान्तिक आहे. अत्यंत बुद्धिमान् आणि अत्यत निर्बुद्ध, अत्यंत प्रामाणिक आणि अत्यंत भामटे, अत्यंत त्यागी आणि अत्यंत स्वार्थी असे आत्यंतिक लोकच राजकारणांत यशस्वी होऊं शकतात आणि मी तर सुवर्णमध्याचा पुरस्कर्ता आहें. आमचं राजकारण कधींही यशस्वी होणार नाहीं!

**रावबहादुर :** कांहींही न करतां अजगरासारखं जागच्या जागीं पडून राहाणं म्हणजे सुवर्णमध्य साधणं अशी आपली कल्पना दिसते. असं राजकारण यशस्वी झालं तर पांगळे हिमालय पर्वत चढून गेल्याचा चमत्कार होईल. असो. [एकदम] तुम्ही ह्या पुष्पाला लग्नाचं कां नाहीं विचारीत? फार सुरेख सून होईल ती आम्हांला!

**सदानंद :** बाबासाहेब, अगदीं माझ्या मनांतलं बोललांत! तिलाच विचारण्याचा विचार करतोंय् मी.

**रावबहादुर :** मग हा विचार ताबडतोब सोडून द्या. तुमच्यासारख्या माणसाला ती प्राण गेला तरी पत्करणार नाहीं! मोठी हुशार मुलगी आहे ती.

**सदानंद :** मुली कितीही हुशार असल्या तरी लग्नाच्या आणि प्रेमाच्या बाबतींत त्यांचा मूर्खपणा गृहीत धरून चालायला हरकत नसते.

**रावबहादुर :** छेः! तिच्याशीं लग्न करण्यास तुम्ही मुळीं सुद्धा पात्र नाहीं. तिनें तुमचा स्वीकार केला तर ती अगदीं निर्बुद्ध आहे असं मी समजेन.

**सदानंद :** मला नकार देण्याइतकी बुद्धि तिच्याजवळ आहे असं मला आढळलं तर मीही तिला स्वीकारणार नाहीं. बुद्धिमान् स्त्रीशीं मैत्री करावी आणि निर्बुद्ध स्त्रीशीं लग्न करावं असा सिद्धान्त आहे माझा ... ही आलीच वाटतं...

[पुष्पा प्रवेश करते.]

**पुष्पा :** नमस्कार बाबासाहेब. [सदानंदकडे पाहून न पाहिल्यासारखें करते.] चंद्रपूरच्या राजेसाहेबांनीं फोनवर तुमची चौकशी केली मघाशीं.

**रावबहादुर :** बाराच्या बंदुकीसाठीं तळमळत असेल बिचारा.

**सदानंद :** पुष्पा, आज सकाळीं ...

**पुष्पा :** [ सदानंदकडे मुद्दाम दुर्लक्ष करून ] होय, तुम्हांला त्या गोष्टीची आठवण करून द्यायला सांगितलंय् राजेसाहेबांनीं. शिवाय ' राजेसाहेब ' ह्या पदवीचा प्रश्न आहेच.

**रावबहादुर :** होय, राजेसाहेबांचं सारं राजकारण ह्या दोन प्रश्नांवरतीं आधारलं आहे.

**सदानंद :** पुष्पा, आज सकाळीं ...

**पुष्पा :** बाबासाहेब, राजेसाहेबांना बाराव्या बंदुकीचा मान दिला तर सरकारचं कांहीं नुकसान आहे का हो त्यांत ?

**रावबहादुर :** [ हसत ] मागितलेली गोष्ट न देणं अथवा फार उशीरां देणं हें सामान्यतः सरकारचं धोरण असतं.

**सदानंद :** [ जोरानें ] पुष्पा ...

**पुष्पा :** अरे वा ? तुम्हीही आहांत वाटतं इथें ! पण तुमच्याशीं बोलायला मला कांहीं कारण दिसत नाहीं !

**सदानंद :** बोलायला कुठें कारण असतं का ?

**पुष्पा :** न बोलायला असतं ! रात्रीं दिलेल्या वचनाचं सकाळीं ज्यांना स्मरण राहात नाहीं त्यांच्याशीं न बोलणंच बरं !

**सदानंद :** तेंच तुला मघापासून सांगतों आहें. आज सकाळीं ...

**पुष्पा :** आज सकाळीं तुम्ही फिरायला जाण्यासाठीं इकडे येणार होतां, पण आलां नाहींत ! तुमच्याजवळ एखादा खुलासा तयार आहेसं दिसतं. पण मला खुलासे नको आहेत. ते नेहमींच खोटे असतात !

**सदानंद :** पण मी सांगतों तो खुलासा नाहीं, तें कारण आहे.

**पुष्पा :** तुमचं बोलणं म्हणजे भाषेचा निव्वळ दुरुपयोग आहे.

**रावबहादुर :** रास्त बोललीस मुली ! आमच्या चिरंजिवांचं बोलणं म्हणजे भाषेचा निव्वळ दुरुपयोग आहे. अगदीं रास्त !

**पुष्पा :** बाबासाहेब, तुमच्यांत आणि तुमच्या चिरंजिवांत केवढी विलक्षण तफावत आहे ! त्यांना जरा वळण लावण्याचा प्रयत्न कां नाहीं करीत तुम्ही ?

**रावबहादुर :** ह्यांना वळण लावण्याचा प्रयत्न! एखाद्या खडकाला वळण लावणं ह्याहून सोपं आहे! सशाचं शिंग शोधून काढणं, वाळूचं तेल काढणं वगैरे असाध्य गोष्टींतच ह्याची जमा आहे.

**पुष्पा :** होय, तेंही खरंच. स्वभावाला औषध नाहीं!

**सदानंद :** मला वाटतं इथें थोडीशी गफलत होते आहे. ज्या गोष्टी माझ्या पाठीमागें बोलायला हव्यात त्या माझ्यासमोर बोलल्या जात आहेत!

**पुष्पा :** लोक आपल्यामागें काय बोलतात हें तरी समजेल तुम्हांला!

**सदानंद :** तें समजून घेणं मला आवडत नाहीं. त्यामुळें माझ्या अहंकारांत भर पडते.

**रावबहादुर :** आले हे मूळपदावर! मला गेलं पाहिजे आतां. महत्त्वाचं काम आहे जरा. [जातात.]

[क्षणभर दोघेंही स्तब्ध असतात.]

**सदानंद :** पुष्पा, मला तुझ्याशीं थोडंसं बोलायचं आहे.

**पुष्पा :** थोडंसं हा शब्द जरा दिलासा देणारा आहे. बोला कीं.

**सदानंद :** थट्टा करूं नकोस. फार महत्त्वाचं आहे तें.

**पुष्पा :** थोडंसं आणि महत्त्वाचं! मला लग्नाचं विचारणार आहांत कीं काय ?

**सदानंद :** होय ... तेंच ·· लग्नाचंच !

**पुष्पा :** छान! आजच्या दिवसांत मला आलेली ही दुसरी मागणी!

**सदानंद :** दुसरी मागणी! कोणत्या गाढवानें माझ्या अगोदर तुला मागणी घातली ?

**पुष्पा :** चंद्रपूरचे राजेसाहेब! त्यांच्या पहिल्या राणीसाहेब कुत्र्यांच्या जोपासनेंत दंग झाल्यामुळें स्वतःच्या अनाथ जिवाचा सांभाळ करण्यासाठीं त्यांना दुसरी राणी हवी आहे. आज सकाळीच त्यांनीं मला फोनवर विचारणा केली!

**सदानंद :** मग-काय सांगितलंस तूं ?

**पुष्पा :** काय सांगितलं असेल ?

**सदानंद :** हो म्हणाली असशील तूं.

**पुष्पा :** मीं 'नाहीं' म्हटलं त्यांना.

**सदानंद :** चूक केलीस तूं!

**पुष्पा :** होय. आणि तीच चूक आतां पुन्हा करणार आहें मी.

**सदानंद :** मला नकार देऊन ?

**पुष्पा :** [ हलकेच फुलदाणीशीं खेळत ] नाहीं. तुम्हांला होकार देऊन !

**सदानंद :** [ तिचा हात हातांत घेऊन ] पुष्पा, मी इतका भाग्यवान् असेन अशी कल्पना नव्हती मला. मी अनंत काळापासून तुझ्यावर प्रेम करीत आलों आहें. पण तुझं प्रेम मला असाध्य वाटत होतं.

**पुष्पा :** किती थोडं समजतं तुम्हांला! मी तुमच्यावर अगदीं वेड्यासारखं प्रेम करीत आहें हें तुमच्याशिवाय सर्वांना, साऱ्या शहराला ठाऊक आहे. तुम्हांला तें कधीं ठाऊक होईल ह्याचीच युगामागून युगं मी वाट पाहात बसलें होतें. मी जातें आतां. आतां वहिनी येतील, आल्याच ह्या.

[ सौदामिनी प्रवेश करते. ]

**सौदामिनी :** केव्हां आलांत तुम्ही ?

**पुष्पा :** केव्हांपासून आले आहेत ते. वाट पाहाताहेत तुमची. कांहीं तरी थोडंसं नि महत्त्वाचं सांगणार आहेत तुम्हांला ते. जातें मी. [ सदानंदला उद्देशून हलक्या आवाजांत ] बागेंत नेहमींच्या झाडाजवळ.

**सदानंद :** नारळीच्या ?

**पुष्पा :** पारिजातकाच्या. [ जाते. ]

**सदानंद :** खरंच, एक फार महत्त्वाची आणि आनंदाची बातमी सांगायची आहे तुम्हांला. काल रात्रीं तारामतीकडून तें पत्र घेतलं आणि जाळून टाकलं. विश्रामवरचं संकट टळलं !

**सौदामिनी :** तें पत्र जाळून टाकलं ! [ कोचावर असहायपणें बसते ] पत्र जाळून टाकलं ! किती आनंदाची बातमी ! सदानंद, आपल्या मित्रासाठीं, आमच्यासाठीं तुम्हीं ही केवढी मोठी गोष्ट केलीत !

**सदानंद :** विश्रामवरचं संकट टळलं पण तारामतीनें दुसऱ्या एका माणसाला संकटांत घातलं आहे.

**सौदामिनी :** [ दचकते. ] तुम्हांला ?

**सदानंद :** तुम्हांला !

**सौदामिनी :** [ अर्थ न समजून ] मला ! मला संकटांत घातलं ?

**सदानंद :** संकट हा शब्द कदाचित् अतिशयोक्त होत असेल. काल रात्रीं तुम्हीं मला पत्र पाठवलंत–मी विश्रामचा अगदीं जवळचा स्नेही ह्या विश्वासानें, भावनेनें पत्र पाठवलंत. तें पत्र तारामतीनें माझ्या खोलींतून चोरून नेलं.

**सौदामिनी** : मग, काय करणार ती त्या पत्राचं? त्यांत कसलं संकट?

**सदानंद** : थोडं स्पष्टपणानें बोलतों सौदामिनीताई. तें पत्र ती विश्रामकडे पाठवणार आहे. त्या पत्रांतून भलताच अर्थ निर्माण करण्याचा प्रयत्न आहे तिचा.

**सौदामिनी** : भलताच अर्थ? ... कसला! [एकदम ध्यानांत येऊन] तसा ... तसा ... अर्थ? शक्य नाहीं! तुम्ही विश्रामचे जिव्हाळ्याचे मित्र, तुमच्या साहाय्यासाठीं, तुमच्या सल्ल्यासाठीं मीं तें पत्र लिहिलं ... पण कसं गेलं तें तिच्या हातीं?

**सदानंद** : तुमचं पत्र आल्यानंतर तुम्ही याल अशी माझी अपेक्षा होती. परंतु तुमच्याऐवजीं तारामती आली, मला नकळत आली आणि माझ्या सूचनेनुसार तिला शेजारच्या खोलींत बसविण्यांत आलं. माझी कल्पना तुम्हीच तिकडे येऊन बसलां आहांत. तेवढ्यांत विश्राम आला आणि कांहीं आवाज झाल्यामुळें त्यानें शेजारच्या खोलींत डोकावून पाहिलं. त्याला तिथें तारामती आढळली; पण मला वाटलं तुमची आणि त्याचीच नजरभेट झाली तिथें. त्यानंतर विश्राम संतापानें निघून गेला. तारामतीजवळून पुढें मीं तें पत्र घेतलं, जाळलं, पण जातांना तुमचं पत्र ती घेऊन गेली.

**सौदामिनी** : आणि हें सारं केव्हां घडलं?

**सदानंद** : रात्रीं दहा अकराच्या सुमारास. मला वाटतं ही सारी हकिगत विश्रामला सांगितली पाहिजे.

**सौदामिनी** : [भयभीत होऊन] रात्रीं अकरा वाजतां तुम्हीं माझी वाट पाहात बसलां होतां हें मी विश्रामना सांगूं? शेजारच्या खोलींत तारामतीला नव्हे तर मला लपवून ठेवण्याचा तुमचा प्रयत्न होता हें त्यांना कळवायचं?

**सदानंद** : खरी गोष्ट विश्रामला समजणं इष्ट आहे.

**सौदामिनी** : नाहीं! नाहीं! मी विश्रामना सांगूं शकणार नाहीं असं!

**सदानंद** : मग तें पत्र विश्रामच्या हातीं जाणार नाहीं ह्याची काळजी घ्यायला हवी. मी आतां कचेरींत जाऊन त्याच्या सेक्रेटरीची भेट घेतों. [जाऊं लागतो आणि दरवाजापासून परत येतो.] कांहीं उपयोग नाहीं सौदामिनीताई. विश्राम इकडे येत आहे आणि त्याच्या हातांत तें पत्र आहे.

**सौदामिनी** : [असहायपणें] काय होणार आतां! तुम्ही विश्रामना वांचवलंत सदानंद, पण माझं—माझं काय केलंत हें!

[ विश्राम पत्र हातांत घेऊन प्रवेश करतो. सदानंद बाजूला उभा राहातो. त्याच्याकडे विश्रामचें लक्ष जात नाहीं. ]

**विश्राम :** [ हर्षभरित होऊन ] 'मला तुमची जरूर आहे, मी तुमच्याकडे येत आहें'! सौदामिनी, मीच तुझ्याकडे येत आहें, आलों आहें. हीं सोन्यामोत्याचीं अक्षरं पाहिल्यावर मी शंभर मैल दूर असतों तरी तुझ्याकडे धावत आलों असतों! सौदामिनी, खरंच तूं मला क्षमा केलीस? खरंच तुला माझी जरूर आहे?

[ सदानंद बाहेर जातो. ]

**सौदामिनी :** होय, मला तुमची जरूर आहे!

**विश्राम :** तूं अद्यापही माझ्यावर प्रेम करतेस सौदामिनी?

**सौदामिनी :** तुमच्यावरचं माझं प्रेम अढळ आहे विश्राम.

**विश्राम :** तुला कल्पना नाहीं सौदामिनी, ह्या पत्रानें तूं मला किती सुखी केलं आहेस ह्याची. तुझ्याइतकी, तुझ्या प्रेमाइतकी इतर कोणत्याही गोष्टीची मातब्बरी मला वाटत नाहीं, कधीं वाटणार नाहीं. सामाजिक आणि राजकीय जीवनांतून हद्दपार होण्यापेक्षां तुझ्या अंतःकरणांतून हद्दपार होण्याचं भय मला अधिक व्याकुल करीत होतं. ती भीति राहिली नाहीं. आतां जगानें मला बहिष्कृत केलं तरी त्याची मला कदर नाहीं!

**सौदामिनी :** तीही भीति आतां उरलेली नाहीं विश्राम. सदानंदांनीं तारामतीकडून तें पत्र घेतलं आणि नष्ट करून टाकलं.

**विश्राम :** नष्ट केलं? खरोखर नष्ट केलं?

**सौदामिनी :** होय नष्ट केलं. जाळून टाकलं!

**विश्राम :** कुणीं सांगितलं हें तुला सौदामिनी?

**सौदामिनी :** स्वतः सदानंदांनीं.

**विश्राम :** सुटलों! संकटांप्रमाणें सुखं सुद्धा जमावानें येतात! अंतःकरणाचा कणन् कण जाळून टाकणाऱ्या त्या राक्षसी भीतीपासून मी मुक्त झालों! कुठें आहे सदानंद?

**सौदामिनी :** बागेंत आहेत वाटतं.

**विश्राम :** मी काल कायदेमंडळांत तें भाषण केलं हें फार चांगलं झालं. भाषणाचे शेवटचे शब्द हवेंत विरून जातात न जातात तोंच मला जगांतून उठून

जावं लागेल अशी माझी कल्पना होती. सदानंदनें तें पत्र नष्ट केलं नसतं तर त्या भाषणांतील शब्दांनींच माझ्या राजकीय जीवनाचा मृत्युलेख लिहिला गेला असता.

**सौदामिनी :** [ कांहींशा खोचकपणानें ] आतां त्या शब्दांच्या पायावरच तुमचं भावी यश उभारलं जाईल !

**विश्राम :** भावी यश! ... होय. पण मला जाणीव आहे सौदामिनी, त्या यशावर माझा अधिकार नाहीं. माझ्या अपराधाचा पुरावा जाळून टाकला गेला पण माझ्या स्मरणांतून तो नष्ट झालेला नाहीं. मी लोकांची वंचना करणार नाहीं ... मी...मी राजीनामा देऊन राजकारणाचा, माझ्या सामाजिक जीवनाचा निरोप घेईन.

**सौदामिनी :** [ अधीरतेनें ] होय, विश्राम तुम्हीं राजकारणाचा त्याग केला पाहिजे, तुमचं कर्तव्य आहे तें.

**विश्राम :** केवढा प्रचंड त्याग! चिऱ्याला चिरा सांधून उभं केलेलं हें मंदिर ...

**सौदामिनी :** एका पापावर उभारलेलं आहे. ह्या मोहांतून मुक्त व्हायला हवं विश्राम. [ विश्राम अस्वस्थ चित्तानें फेऱ्या घालतो. ]

**विश्राम :** [ सौदामिनीजवळ येऊन तिच्या खांद्यावर हात ठेवीत ] ह्या जीवनापासून खूप दूर, कुठल्या तरी एकान्त जागीं, एखाद्या लहानशा खेडेगांवांत तूं माझ्याबरोबर सुखानें राहूं शकशील ?

**सौदामिनी :** होय, राहूं शकेन.

**विश्राम :** माझ्याबद्दलच्या तुझ्या साऱ्या महत्त्वाकांक्षा मातीला मिळतील. तुला वाईट वाटणार नाहीं त्याबद्दल ?

**सौदामिनी :** माझ्या सर्व महत्त्वाकांक्षा मातीला मिळून गेल्या आहेत विश्राम. महत्त्वाकांक्षेनेंच तुम्हांला तें पाप करायला लावलं. जगाच्या एखाद्या अज्ञात कोपऱ्यांत आणि परस्परांवरील प्रेमाच्या आश्रयानें आपण आपलं आयुष्य कंठीत राहावं इतकीच इच्छा आहे माझी.

[ सदानंद प्रवेश करतो. त्याच्या बटनहोलमध्यें गुलाबाचें टवटवीत फूल आहे आणि एकंदरींत तो आनंदित आहे. ]

**विश्राम :** [पुढें जाऊन त्याचा हात धरीत] सदानंद, मी तुझा ऋणी आहें. अक्षरशः ऋणी आहें. ह्या ऋणाची माझ्याकडून कधींही परतफेड होऊं शकणार नाहीं.

**सदानंद :** होऊं शकेल. मी तुझ्याकडे एक मागणी करणार आहें. आतांच तुझ्या बागेमध्यें नारळाच्या ... आपलं पारिजातकाच्या झाडाजवळ ...

**महादेव :** [प्रवेश करून] रावबहादुर बाबासाहेब.

**सदानंद :** आले हे मूळपदावर ! आमचे पितृदेव नेमके नको त्या वेळीं उपस्थित होतात !

[रावबहादुर प्रवेश करतात.]

**रावबहादुर :** अभिनंदन ! अभिनंदन विश्राम ! तुझं कालचं भाषण कायदेमंडळाच्या अलीकडच्या इतिहासामध्यें अगदीं अद्वितीय आहे आणि तुझ्या स्वतःच्या दृष्टीनें हें भाषण तुझ्या अपेक्षेबाहेर फलप्रद झालं आहे. एक अत्यंत आनंदाची, अत्यंत महत्त्वाची बातमी घेऊन आलों आहें मी.

**सौदामिनी :** [किंचित् अस्वस्थतेनें] अत्यंत आनंदाची बातमी ?

**रावबहादुर :** सौदामिनीबाई, आज गृहमंत्रीपदावर असलेले आपले विश्राम लवकरच ह्या प्रांताचे पंतप्रधान होणार आहेत !

**विश्राम :**<br>**सौदामिनी :** } पंतप्रधान !

**रावबहादुर :** पंतप्रधान ! हिंदुस्थानांतील ह्या सर्वात श्रेष्ठ प्रांताचे पंतप्रधान ! पार्टीशीं मतभेद झाल्यामुळें पंतप्रधानांनीं आज अकस्मात् राजीनामा दिला असून त्यांच्या जागेवर विश्रामची योजना करण्याचं पार्टीच्या नेत्यांनीं ठरविलं आहे. आतांच मी अध्यक्षांकडून आलों.

**विश्राम :** [विजयी उत्साहानें] मी पंतप्रधान !

**रावबहादुर :** तुझ्या संमतीसाठीं अध्यक्षांनीं हें पत्र दिलं आहे.

[पत्र विश्रामजवळ देतात.]

**विश्राम :** [पत्र वाचीत] अजून खरं वाटत नाहीं हें ! मला मंत्रिमंडळांत घेतलं तेव्हांच पार्टीतील अनेक लोकांनीं विरोध केला होता.

**रावबहादुर :** तुझे विरोधक आणि वैरी सुद्धा आतां तुझे भक्त झाले आहेत. संशयाच्या पलीकडे असलेला प्रामाणिकपणा, प्रखर तत्त्वनिष्ठा आणि निःस्वार्थ

कर्तबगारी ह्या तुझ्या गुणांमुळें सारेजण तुझे चहाते बनले आहेत. [ सदानंदाकडे बघून ] तुमच्याजवळ ह्यांतला एक सुद्धा गुण नाहीं !

**सदानंद :** गुण नाहींत पण ह्या गुणांच्याच तोडीचे कांहीं दुर्गुण आहेत. आणि त्या दुर्गुणांमुळें लोक माझेही चहाते बनले आहेत !

**रावबहादुर :** हंः ! आलांत मूळपदावर !

[ विश्राम पत्र वाचून आनंदित होतो आणि प्रधानपद स्वीकारण्याच्या बेतांत असतो. तेवढ्यांत त्याची नजर सौदामिनीकडे जाते. ती त्याच्याकडे किंचित् कठोरपणानें आणि अनिमिष दृष्टीनें रोखून पाहात असते. ]

**विश्राम :** बाबासाहेब, हा सन्मान मला स्वीकारतां येत नाहीं. मला तो स्वीकारायची इच्छा नाहीं.

**रावबहादुर :** [ जवळ जवळ ओरडत ] काय ? स्वीकारायची इच्छा नाहीं ?

**विश्राम :** मीं राजकारणांतून निवृत्त व्हायचं ठरवलं आहे !

**रावबहादुर :** [ क्रोधानें ] प्रधानपद स्वीकारायची इच्छा नाहीं ! राजकारणांतून निवृत्त व्हायचं ठरवलं आहे ! इतका गाढवपणा माझ्या आयुष्यांत मीं कधीं पाहिला नाहीं ! शुद्धीवर आहांत कीं ... माफ कर सौदामिनी, माफ कर विश्राम ! रागाच्या भरांत असं कांहीं तरी बोलून जातों मी. [ सदानंदकडे पाहून ] खबरदार असं माझ्याकडे पाहाल तर !

**सदानंद :** नाहीं बाबासाहेब, मी तुमच्याकडे पाहात नाहीं.

**रावबहादुर :** सौदामिनी, तूं बुद्धिमान् आहेस, हुषार आहेस, व्यवहारी आहेस. तुझ्यासारखी चतुर मुलगी शोधायला गेलं तरी सापडणार नाहीं असं सर्वांना मी सांगत असतों. तुझ्या नवऱ्याला तूं ह्या गाढव ... ह्या वेडेपणापासून परावृत्त केलं पाहिजे. तुझं कर्तव्य आहे तें.

**सौदामिनी :** विश्रामनें सांगितलं तें मलाही मान्य आहे बाबासाहेब.

**रावबहादुर :** तुला मान्य आहे ! जय रघुवीर !

**सौदामिनी :** [ विश्रामजवळ जात ] नुसतं मान्य नाहीं. ह्या मनोधैर्याबद्दल विश्राम मला पूर्वी कधींही वाटले नाहींत इतके आदरणीय वाटतात. ह्या त्यागांत त्यांचा खरा मोठेपणा आहे. ह्या क्षणाला विश्राम जो मोठेपणा दाखवीत आहेत त्यावरून अनेक प्रधानपदं ओवाळून टाकतां येतील ! [ विश्रामला उद्देशून ] जा विश्राम, नकाराचं उत्तर ताबडतोब लिहून टाका.

**विश्राम :** [ किंचित् उद्विग्नतेनें ] होय, ताबडतोबच लिहून टाकलेलं बरं ! अशी संधि एखाद्याच्या आयुष्यांत आणि एखाद्या वेळींच येते ... पण ती नाकारलीच पाहिजे. बाबासाहेब, आतां येतों मी पत्र लिहून.

**सौदामिनी :** मी येऊं का ?

**विश्राम :** आलीस तर बरं होईल.

[ दोघें आंत जातात. ]

**रावबहादुर :** काय भानगड झाली आहे ह्या घरामध्यें ? कांहीं तरी [ डोक्याला बोट लावीत ] बिघाड आहे मला वाटतं ! अरे अरे, नवरा आणि बायको दोघांनाही पछाडलं ह्या वेडानें ! वाईट, फार वाईट !

**सदानंद :** हें वेड नाहीं बाबासाहेब.

**रावबहादुर :** मग काय आहे ?

**सदानंद :** हें शहाणपण आहे ! संशयाच्या पलीकडे असलेला हा प्रामाणिकपणा आहे; ही प्रखर तत्त्वनिष्ठा आहे, ही निःस्वार्थ कर्तबगारी आहे !

**रावबहादुर :** [ हे आपलेच शब्द आहेत हें ध्यानांत न येतां ] हं ! हें सारं आजकालचं शब्दावडंबर आहे. तीस चाळीस वर्षांपूर्वी ह्याच गोष्टीला आम्ही वेड म्हणत होतों. साधा सुटसुटीत शब्द ! चला, ह्या घरांत अधिक वेळ थांबण्यांत मतलब नाहीं. [ बाहेरच्या दाराकडे जाऊं लागतात. ]

**सदानंद :** [ हात धरून त्यांना बागेकडील दरवाजाकडे नेत ] इकडे बागेंत जा बाबासाहेब. बागेंतल्या नारळीच्या — आपलं — पारिजातकाच्या झाडाजवळ.

**रावबहादुर :** [ आश्चर्यानें त्याच्याकडे पाहात ] पारिजातकाच्या झाडाजवळ ! तुम्हांलाही पछाडलं वाटतं !

**सदानंद :** मला पछाडणारं वेड तुम्हांला त्या पारिजातकाच्या झाडाजवळ आढळून येईल. तुम्हांला सुद्धा पछाडील तें !

**रावबहादुर :** हंः ! काय एकंदर घोटाळा आहे कुणास ठाऊक !

[ बाहेर जातात. आंतून सौदामिनी येते. ]

**सदानंद :** सौदामिनीताई, कालपासून सुरू असलेल्या नाटकाच्या ह्या अखेरच्या अंकांत तारामतीची भूमिका तुम्हींच करण्याचं ठरवलं आहे असं दिसतं ! तारामती गेली नाहीं, तुमच्या रूपानें ती आजही इथें वावरते आहे !

**सौदामिनी :** [ दचकते. ] सदानंद ! काय बोलतां आहांत हें !

**सदानंद :** कठोर आहे, कटु आहे, पण खरं आहे तें. तारामतीला विश्रामचा नाश करायचा होता. एक पाप झाकण्यासाठीं त्याला दुसरं पाप करायला लावणं अथवा त्याचं सार्वजनिक जीवन बरबाद करणं हा तिचा उद्देश होता. पहिल्या अधःपातापासून तुम्ही त्याला मुक्त केलंत परंतु त्याचा दुसरा अधःपात तुम्ही आपल्या हातानें घडवून आणीत आहांत. तारामतीला जें करतां आलं नाहीं तें तुम्ही करीत आहांत.

**सौदामिनी :** [बावरून] तारामतीला करायचं होतं तें मी करतें आहें!

**सदानंद :** [बेफिकीरपणाच्या आवरणाखालीं दडलेला तत्वज्ञ जागा होऊन] सौदामिनीताई, काल रात्रीं तुम्हीं मला पत्र लिहिलं आणि माझ्या साहाय्याची, माझ्या सल्ल्याची मागणी केली. आतां ह्या क्षणाला तुम्हांला त्या साहाय्याची आणि सल्ल्याची खरी आवश्यकता आहे. ज्या विश्वासानें तुम्ही मला पत्र लिहिलं त्या विश्वासानें तुम्ही माझं साहाय्य स्वीकारणं जरूर आहे. तुमचं विश्रामवर प्रेम आहे. विश्रामचं प्रेम हें तुमचं साक्षात् जीवन आहे. हें प्रेम तुम्हांला मारून टाकायचं आहे का? सार्वजनिक जीवनांत अत्युच्च स्थान मिळावं म्हणून विश्रामनें आजवर जी तपश्चर्या केली, जो अलौकिक त्याग केला, जी प्रखर तत्त्वनिष्ठा दाखवली त्या सर्वांच्या प्रेतांवर उभं राहून थाटलेला नवा संसार त्याला सुखी करूं शकेल का? साऱ्या महत्त्वाकांक्षी जीवनापासून दूर, जगाच्या एखाद्या अज्ञात कोपऱ्यांत, हा कर्तबगार आणि महत्त्वाकांक्षी पुरुष एखाद्या कीटकासारखा जगूं लागला तर जगणं हा त्याला शाप वाटणार नाहीं का? त्याचा भविष्यकाळ एखाद्या वाळवंटासारखा वैराण, अर्थशून्य होईल आणि त्याचं पराभूत मन पूर्वस्मृतींच्या दलदलीमध्यें एखाद्या पिशाचाप्रमाणें आक्रोश करीत संचार करूं लागेल. नाहीं, सौदामिनीताई, वैभव, गौरव आणि अधिकार ह्यांसाठीं जन्मलेल्या आणि आपल्या कर्तृत्वानें तें सारं हस्तगत करणाऱ्या तुमच्या पतीच्या जीवनाची तुम्ही अशी राखरांगोळी करूं शकत नाहीं. माफ करा, पण न्यायाधीशाच्या जागेवर बसून त्याला अशा रीतीनें पंगू करण्याचा, मारून टाकण्याचा अधिकार तुम्हांला नाहीं, कोणत्याही स्त्रीला नाहीं. बायका शासन करण्यासाठीं नाहींत, क्षमा करण्यासाठीं आहेत! तारुण्याच्या नवथर काळांत हातून घडलेल्या एका अपराधाबद्दल तुम्ही त्याला इतकं प्रायश्चित्त देणार? पुरुषाच्या जीवनाचं महत्त्व स्त्रीच्या जीवनाहून अधिक आहे. तें अधिक विशाल असतं, अधिक सामर्थ्यशील असतं, अधिक

समाजोपयोगी असतं. स्त्रिया आपल्या भावनांच्या चार भिंतींत जगत असतात तर पुरुषांच्या बुद्धिशाली जीवनप्रवाहाला पृथ्वीच्या सीमाही अपुऱ्या पडतात. ह्या लहान जीवनासाठीं त्या मोठ्या जीवनाचं बलिदान करणं हा गुन्हा आहे. सौदामिनीताई, मी तुम्हांला तुमचा साहाय्यकर्ता म्हणून सांगतों, ही भयंकर चूक करूं नका. जी स्त्री पुरुषावर प्रेम करते आणि त्याचं प्रेम संपादन करूं शकते ती जगाच्या दृष्टीनें आपलं सारं कांहीं कर्तव्य पार पाडते.

**सौदामिनी :** [ दुर्बलतेनें ] पण प्रधानपद स्वीकारायचं नाहीं आणि राजकारणांतून निवृत्त व्हायचं हा विचार विश्रामचाच आहे. मीं माझे विचार त्यांच्यावर लादलेले नाहींत. त्यांना तें आपलं कर्तव्य वाटतं.

**सदानंद :** त्याचं कारण इतकंच कीं हें कर्तव्य पार पाडलं नाहीं तर आपल्या पत्नीच्या प्रेमाला आपण मुकूं अशी विश्रामला भीति वाटते. तुमच्या प्रेमासाठीं, तुमच्या भावनेच्या समाधानासाठीं तो आपल्या सर्वस्वाची आहुति देत आहे. ह्या आहुतीचा, ह्या बलिदानाचा स्वीकार करूं नका सौदामिनीताई. कोणतंही प्रेम इतक्या मोठ्या बलिदानाला पात्र असूं शकणार नाहीं. आपण स्त्रीपुरुषांनीं आपल्या प्रेमासाठीं इतका मोठा मोबदला घेतां कामा नये. कारण आपण केलेल्या त्यागाची किंमत मिळवलेल्या प्रेमापेक्षां फार जास्त आहे हें लौकरच समजून येतं आणि नंतर त्या प्रेमाच्या आणि त्या प्रेमाबरोबर त्या दोन जीवांच्या जीवनाच्याही चिंधड्या उडतात ! विश्रामला झाली ती शिक्षा पुरे आहे. ह्याहून अधिक शिक्षेचा आग्रह धरूं नका.

**सौदामिनी :** शिक्षा विश्रामलाच झाली नाहीं. मलाही झाली ! मी त्यांना आदर्श समजत होतें ...

**सदानंद :** कोणताही पुरुष, कोणतीही स्त्री आदर्शपदाला पोहोचूं शकत नाहीं. एखाद्यावर खुनाचा खोटा आरोप करून त्याला सुळावर चढवणं जितकं वाईट तितकंच त्याच्यावर आदर्शतेचा आरोप करून आपल्या अपेक्षेशीं त्याचं वर्तन सुसंगत नाहीं म्हणून त्याला शासन करणं वाईट. हे दूरचे दिवे आहेत सौदामिनीताई. त्यांच्या प्रकाशांत आपण जीवनाची वाट चालून जावं पण ते दूरचे आहेत ह्याचा विसर होऊं देऊं नये. आणि विश्राम तर खरोखरीच थोर आहे. त्याचा सारा चांगुलपणा, सारा थोरपणा एका अपराधामुळें नष्ट होऊं शकतो काय ? क्षमा करा सौदामिनीताई, पण तुम्ही स्वतः तरी आदर्श आहांत का ? तारामतीनें

पाठवलेलं पत्र विश्रामच्या हातीं जाऊं नये अशी व्यवस्था तुम्ही केलीतच ना ? हें पत्र तुम्ही आपल्यालाच लिहिलं आहे असा तुम्ही विश्रामचा गैरसमज केला नाहीं काय ? तुम्ही फार थोर आहांत, विश्रामपेक्षांही थोर आहांत हें मला ठाऊक आहे. आणि तरीही तुम्हांला असत्याचा आश्रय घ्यावा लागला.

[ सौदामिनी हताशपणें कोचावर डोकें टेकते.
विश्राम पत्राचा कागद घेऊन प्रवेश करतो. ]

**विश्राम** : सौदामिनी, हा बघ पत्राचा मसुदा. वाचून दाखवूं तुला ?

**सौदामिनी** : द्या इकडे.

[ विश्रामजवळून कागद घेते, वाचते आणि नंतर
आवेगानें तो फाडून त्याच्या चिध्या करते. ]

**विश्राम** : काय केलंस हें सौदामिनी ?

**सौदामिनी** : न्यायाधीशाच्या जागेवर बसून तुम्हांला अशा रीतीनें पंगू करण्याचा अधिकार मला नाहीं, कोणत्याही स्त्रीला नाहीं. बायका शासन करण्यासाठीं नाहींत. क्षमा करण्यासाठीं आहेत. पुरुषाच्या जीवनाचं महत्त्व स्त्रीच्या जीवनाहून अधिक आहे. स्त्रिया आपल्या भावनांच्या चार भिंतींत जगत असतात. स्त्रीपुरुषांनीं आपल्या प्रेमासाठीं इतका मोठा मोबदला घेतां कामा नये. हे दूरचे दिवे आहेत. त्यांच्या प्रकाशांत आपण जीवनाची वाट चालून जावं पण ते दूरचे आहेत ह्याचा विसर होऊं देऊं नये ! सदानंदांनीं आत्तां मला हें सारं सांगितलं, शिकवलं. आणि इतकंच शिकवलं असं नाहीं. विश्राम, तुमच्या सर्वस्वाची आहुति मी घेणार नाहीं, तुम्हांला देऊं देणार नाहीं !

**विश्राम** : सौदामिनी ! सौदामिनी !

**सौदामिनी** : विश्राम, तुम्ही मला क्षमा करा आणि मी —होय मीही— तुमच्या हातून जें घडलं तें विसरून जातें. तुमच्या प्रेमाची महती मला इतर साऱ्या गोष्टींहून अधिक वाटते.

**विश्राम** : [ आनंदाच्या व भावनेच्या आवेगानें सौदामिनीचा हात धरीत ] सौदामिनी ! माझी सौदामिनी ! सदानंद, तुझे आभार मानायला माझ्याजवळ शब्द नाहींत.

**सदानंद** : माझे आभार मानायचं कारण नाहीं. सौदामिनीताईंचेच आभार मानायला हवे तूं.

**सौदामिनी** : भलतंच! आम्ही दोघांनीं तुमचेच आभार मानायला हवे.

**विश्राम** : बाबासाहेब आले तेव्हां तूं कांहीं तरी सांगत होतास. कसली मागणी?

**सदानंद** : पुष्पाच्या आणि माझ्या लग्नाला संमति देण्याची.

**सौदामिनी** : देव पावला! अगदीं माझ्या मनासारखं झालं!

**विश्राम** : पुष्पाचं तुझ्याशीं लग्न?

**सदानंद** : होय, तुझी संमति असल्यास.

**विश्राम** : सदानंद, ही संमति मी प्रामाणिकपणें देऊं शकलों असतों तर माझ्या स्वतःच्याच आनंदाला पारावार उरला नसता. पण तशी ती मी देऊं शकत नाहीं.

**सौदामिनी** : कारण?

**विश्राम** : कारण! कारण सांगितलं तर तुला आवडेल का सदानंद?

**सदानंद** : जरूर आवडेल.

**विश्राम** : काल रात्रीं मी तुझ्याकडे आलों तेव्हां तारामती शेजारच्या खोलींत बसलेली होती, दडवलेली होती. मी त्या खोलीकडे जाऊं नये असा तुझा आग्रह होता. तारामतीचे आणि तुझे संबंध कशाही प्रकारचे असोत. मला त्यासंबंधीं कांहीं म्हणायचं नाहीं. परंतु तुझ्या स्नेहासाठीं मी पुष्पाचा बळी देणार नाहीं. पुष्पाचं तुझ्यावर प्रेम आहे पण एकांगी प्रेमाचीं लग्नं निष्प्रेम लग्नाहूनही अधिक दुःखदायक ठरतात.

**सदानंद** : ह्यावर मीं कांहीं बोलूं शकत नाहीं.

**सौदामिनी** : मी बोलूं शकतें. विश्राम, काल रात्रीं शेजारच्या खोलींत तारामती आहे हें सदानंदांनाही ठाऊक नव्हतं. ते एका स्त्रीची वाट पाहात होते. पण ती स्त्री तारामती नव्हती.

**विश्राम** : तारामती नव्हती?

**सौदामिनी** : खोलींत मी आहें अशी त्यांची कल्पना होती. दुपारीं त्यांनीं मला सांगितलं होतं, तुम्हांला साहाय्याची जरूर वाटली तर विश्वासानें माझ्याकडे या. रात्रीं आपलं भांडण—होय भांडणच तें—झाल्यावर मला साहाय्याची, कुणाच्या तरी सल्ल्याची जरूर वाटली. मीं सदानंदांना पत्र लिहिलं. [विश्राम खिशांतून पत्र काढतो.] होय, तेंच पत्र. पण मी सदानंदांकडे गेलें नाहीं. असले प्रश्न स्वतःच्या सामर्थ्यानेंच सोडवले पाहिजेत असं मला वाटलं. माझ्याऐवजीं तारामती सदानंदांकडे

गेली आणि जातांना हें पत्र तिनें चोरून नेलं. तें तिनें आज तुमच्याकडे पाठवलं. हेतु हा कीं ... कीं, तुमच्या मनांत ... नाहीं सांगतां येणार तें मला !

**विश्राम :** आणि म्हणून तूं हें मला मघाशीं सांगितलं नाहींस! सौदामिनी, एका अपराधामुळें तुझ्या दृष्टीनें इतका का मी अधःपतित झालों? असल्या क्षुद्र प्रयत्नांनीं क्षणभर सुद्धा माझ्या मनांत संशय येणार नाहीं हें तुला ठाऊक नाहीं का? बायकांची बुद्धि कुठें तरी घसरल्याशिवाय राहात नाहीं. तारामतीला ह्या पत्रावर नांव घालायचा विसर पडला.

**सौदामिनी :** आतां मी घालतें नांव आणि तेंही माझ्या विश्रामचं. मला तुमची जरूर आहे. मी तुमच्याकडे येत आहें.

[ विश्रामजवळ जाऊन पत्र घेते व त्यावर नांव घालते. ]

**विश्राम :** ~~वीस~~ दिवसांत आपण एकमेकांपासून किती दूर गेलों आणि पुन्हा किती जवळ आलों!

**सदानंद :** सौदामिनीताई, मला आलेलं पत्र आहे तें! माझं पत्र मला मिळायला हवं!

**सौदामिनी :** नाहीं. पत्र मिळणार नाहीं, पुष्पा मिळेल!

**सदानंद :** त्याचाही नेम नाहीं आतां. बायकांचं चित्त फार चंचल असतं म्हणतात. तिनें हो म्हटल्याला वीस मिनिटं होऊन गेलीं!

[ पुष्पा आणि रावबहादुर प्रवेश करतात. ]

**रावबहादुर :** नाहीं. मी आतां थांबत नाहीं पुष्पा. आज बरींच कार्यं आहेत मला. पार्टीच्या कार्यकारी मंडळाच्या सभेलाही जायचं आहे. [ सदानंदाकडे वळून ] मीं दिलेली संध्याकाळची मुदत लक्षांत ठेवा,

**सदानंद :** बाबासाहेब, तुम्हांला सांगितल्याप्रमाणें तूर्त एक लग्न तरी ठरवून टाकलं आहे.

**रावबहादुर :** ठरवून टाकलं! कुणाशीं?

**सदानंद :** बागेमध्यें नारळीच्या–आपलं–पारिजातकाच्या झाडाजवळ तुम्ही आपल्या भावी सुनेशींच बोलत होतां.

**रावबहादुर :** काय? पुष्पानें तुमचा स्वीकार केला! वा वा! छान! आमचंच म्हणणं चुकलं एकंदरींत! फारच छान! शेवटीं आयुष्यांत कांहीं तरी केलं म्हणायचं तुम्हीं!

**सदानंद :** पुष्पानें माझा स्वीकार केला इतकंच नव्हे तर विश्रामनेंही राजीनामा पाठवायचा नाहीं असं ठरवलं आहे.

**रावबहादुर :** वा वा! आनंदीआनंद! तें मघाशीं काय आलं होतं तें गेलं वाटतं! विश्राम, तुझं अभिनंदन करतों मी. उद्यां प्रांताचा प्रधान झालास आणि फेडरेशन आलं तर हिंदुस्थानचाही पंतप्रधान होशील तूं!

**विश्राम :** आपल्या आशीर्वादांतच माझं सामर्थ्य आहे बाबासाहेब.

**रावबहादुर :** [सदानंदाकडे वळून] आणि तुम्ही काय होणार? इतर सारं राहो, पण आदर्श पति तरी व्हा!

**सदानंद :** आदर्श पति! अरबी भाषेंतील एक सुरस आणि चमत्कारिक गोष्ट आहे ती!

**पुष्पा :** खरंच. मलाही नको आहे आदर्श पति.

**रावबहादुर :** मग काय हवंय् तुला?

**पुष्पा :** मला ... मला आदर्श पत्नी व्हायचं आहे!

**सौदामिनी :** बाबासाहेब, तुमच्या सूनबाईनें सांगितल्याप्रमाणें आतां सर्वांनीं इकडेच जेवायला थांबलं पाहिजे.

**रावबहादुर :** आतां प्राप्तच आहे तें. सूनबाईची इच्छा!

**महादेव :** [प्रवेशून] तयारी आहे सारी. चलावं सर्वांनीं.

[सर्वजण आंत जातात. विश्राम एकटा मागें राहातो आणि विचारमग्न झाल्याप्रमाणें कोचावर बसतो. सौदामिनी परत येते आणि त्याच्याजवळ जाते.]

**सौदामिनी :** चलायचं ना?

**विश्राम :** सौदामिनी, एक विचारूं का? हें प्रेम आहे कीं ही दया आहे?

**सौदामिनी :** दया दाखविण्याचा मला अधिकार नाहीं, विश्राम. हें प्रेम आहे. निव्वळ प्रेम आहे. आपल्या दोघांच्याही जीवनाला आज नव्यानें प्रारंभ झाला आहे. आणि या नव्या जीवनाच्या मुळाशीं आदर्शतेच्या कल्पना नाहींत; तर केवळ प्रेम आहे, भक्ति आहे! [वाकून त्याच्या मस्तकाचें चुंबन घेते.]

---